


नोंदणी क्रं. एफ.१६०१४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्त-मंडळाचें मासिक

वर्ष तिसरें
अंक तिसरा

# नवभारत

डिसेंबर
१९४९

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर-आचार्य स. ज. भागवत - श्री. हरि कृष्ण मोहनी - प्रा. वि. म. बेडेकर
का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक र. ग. जोशी यांनीं सुलभ मुद्रणालय, २९१ शनिवार, पुणें २, येथें छापून सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्त-मंडळाकरितां तेथेंच नवभारत कार्यालयांत प्रसिद्ध केलें.






# 'नवभारत', डिसेंबर १९४९

## लेखक-परिचय

**प्रा. म. गो. भाटे**, एम्. ए., बी. एस्सी. (एकॉन.), लंडन—पुणें येथील फर्ग्युसन कॉलेजमध्यें इंग्रजीचे प्राध्यापक. "Literature & Literary Criticism" या पुस्तकाचे लेखक.

**प्रा. य. द. भावे**—बेळगांवच्या लिंगराज कॉलेजमध्यें इंग्रजीचे प्राध्यापक. 'आर्द्रा' या कवितासंग्रहाचे लेखक.

**प्रा. शि. का. संत**—मुंबई येथील 'न्यू जॅक प्रिंटिंग वर्क्स लि.' या छापखान्यांत अक्षरमुद्रणा-(Letter-press)चे दिग्दर्शक; मुंबईच्या व्ही. जे. टी. इन्स्टिटयूटमध्यें अक्षरमुद्रणा-(Typography)चे प्राध्यापक. मुद्रणविषयावर यांनीं बरेंच लिखाण केलें आहे.

**श्री. चन्द्रोदय भट्टाचार्य**—अमळनेर येथील 'इंडियन इन्स्टिटयूट ऑफ फिलासफी' या संस्थेमध्यें हे सुमारें दहा वर्षें 'फेलो' आहेत. 'दि फिलासफिकल कार्टर्ली' मध्यें यांचे लेख येत असतात.

**प्रा. द. गं. कोपरकर**—अहमदनगर येथील कॉलेजमध्यें संस्कृतचे प्राध्यापक.

**श्री. पुरुषोत्तम पाटील**—हे पुणें येथें फर्ग्युसन कॉलेजमध्यें बी. ए.च्या वर्गांत विद्यार्थी असून, त्यांच्या कविता मराठी नियतकालिकांतून प्रसिद्ध होत असतात.

**श्री. शिवाजी नरहर भावे**—महाभारत, ज्ञानेश्वरी इत्यादींचे व्यासंगी. 'श्री श्लोक मनाचे : भाष्य, संगति व सार' या पुस्तकाचे लेखक. आचार्य विनोबा यांचे धाकटे बंधू आणि आश्रमीय साधक.

**प्रा. अ. रा. कामत**—पुणें येथील फर्ग्युसन कॉलेजमध्यें गणिताचे प्राध्यापक. 'नवीन शिक्षण', 'सोव्हिएट आर्थिक नियोजन' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**श्री. वि. न. बरवे**, बी. ए. एल्एल्. बी.—महाराष्ट्रांतील अत्यंत निष्ठावंत सामाजिक कार्यकर्ते. 'दलित सेवक' या पाक्षिकाचे संपादक. महाराष्ट्र–प्रांतिक–हरिजनसेवकसंघाचे १९३७ पासून अध्यक्ष. अखिल–भारतीय–हरिजन सेवक-संघाच्या व भारतीय भिल्ल–सेवा–मंडळाचे उपाध्यक्ष. आदिमजाति-सेवक-संघाच्या कार्यकारिणीचे सदस्य. या कामांमुळें श्री. ठक्करबाप्पांशीं यांचा बराच निकट संबंध आला आहे.

**श्री. देवदत्त अ. दाभोलकर**—पुणें येथील बृ. म. कॉमर्स कॉलेजमध्यें प्राध्यापक.

**श्री. ना. गो. चापेकर** (बदलापूर)—सुप्रसिद्ध विचारवंत साहित्यिक आणि समाजशास्त्रज्ञ. "आमचा गांव", "समाजनियंत्रण", "वैदिक निबंध" इत्यादि पुस्तकांचे लेखक.

---

अनुक्रमणिका



प्रा. म. गो. माटे

# वाङ्मयाचें स्वरूप

विवक्षित कवितेचें डोळस वाचन करून तिचें मूल्यमापन करणें ही टीकाकाराची विशिष्ट कामगिरी आहे. ती पार पाडतांना वाङ्मय म्हणजे काय, वाङ्मयाचें स्वरूप कशा प्रकारचें असतें, वाङ्मयाचें साध्य कोणतें, या सामान्य प्रश्नांवर त्यानें आपल्या कल्पना निश्चित करावयाला हव्या. ही कविता उत्तम आहे का हें ठरविण्याच्या आधीं हें लिखाण कविता आहे का, वाङ्मय आहे का, या प्रकारची मूलगामी पृच्छा करावी लागते. विविध शब्दलेख वाङ्मय या एका पातळीवर असले तरच त्यांचा गुणक्रम लावणें व त्यांचें मूल्यमापन करणें शक्य होईल. म्हणून वाङ्मयाच्या स्वरूपाची चिकित्सा करणें प्राप्त आहे.

**वाङ्मय** या शब्दानें दिग्दर्शित केलेले अर्थ वाङ्मयाचें मर्म जाणवून देण्यास उपयुक्त आहेत. आपलें मनोगत बोलून दाखविण्याची शक्ति ती वाणी; वाणीचा उपयोग करून जे बोल बोलले गेले, जे उद्गार निघाले ते म्हणजेच वाङ्मय; वाणीमध्यें बोलणाराचा आवाज व हावभाव, बोलले जाणारे शब्द, त्यांचे अर्थ व नाद, या गोष्टींचा अंतर्भाव होतो. वाङ्मयाचें प्राथमिक स्वरूप म्हणजे आर्त उद्गार किंवा आरोळी हें खरें; पण सुसंस्कृत समाजांत भाषेला प्रगल्भता आलेली असल्यामुळें वाङ्मयाच्या परिणत अवस्थेंत भाषेच्या सर्वांगीण उपयोगाला महत्त्वाचें स्थान आहे. एका दृष्टीनें टी. एस्. ईलियट म्हणतो त्याप्रमाणें कविता म्हणजे सुभाषित, योग्य शब्दांची योग्य रचना[1]—एवढीच व्याख्या पुरेशी आहे. पण त्या व्याख्येला पूरक म्हणून हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, शब्द किंवा भाषा ही साध्य नसून माध्यम आहे. भाषा ही एक शक्ति आहे. तिचा उपयोग करून जें साधावयाचें तें शब्दातीत आहे.

## शब्दाचें विचार व भावना यांना आवाहन

ज्या काळीं मुद्रणकला अवगत नव्हती त्या काळीं वाङ्मय हें बहुशः आलिखित व मुखोद्गत असणें स्वाभाविक होतें, व त्यामुळें बोलणाराचा आवाज व हावभाव यांचें कार्य महत्त्वाचें होतें. आधुनिक काळांत पुस्तकांतील पानांवर छापलेल्या शब्दांच्या ओळी हेंच वाङ्मयाचें स्थूल स्वरूप झालें आहे. कवि हा लेखक व श्रोता हा वाचक झाला आहे. पानावर छापलेल्या खुणा वाचक डोळ्यांनीं बघतो, व त्या निरर्थक खुणांचे सार्थ शब्द तो आपल्या मनोव्यापारानें करितो. मुद्रित वाङ्मयाच्या बाबतींत 'डोळ्यांनीं बघतों ध्वनी' हा अन्वय-व्यतिरेक नाहीं; तें सूचक सत्य आहे. म्हणून वाङ्मयाच्या स्वरूपाची चिकित्सा व मुद्रित शब्दांच्या स्वरूपाची चिकित्सा यांचे संबंध, देह आणि देही यांच्या संबंधाप्रमाणें जिव्हाळ्याचे आहेत. वाङ्मयाच्या कल्पनेंत शब्दांना असलेलें महत्त्व लक्षांत

---

1 "... excellent words in excellent arrangement and excellent metre."

—*T. S. Eliot : The Sacred Wood,* ( page IX )







घेतलें म्हणजे श्रेष्ठ कवींना 'शब्दसृष्टीचे ईश्वर' म्हणून गौरविण्यांत असलेलें औचित्य मनाला पटतें.

पानावर छापलेल्या खुणा डोळ्यांनीं पाहून त्यांनीं दिग्दर्शित केलेले शब्द वाचक ओळखतो. हा वाचनाचा आरंभ. कुशल लेखक आपलें मनोगत व्यक्त करण्यासाठीं चातुर्यानें शब्दयोजना करतो. शब्दयोजनेचें कौशल्य जाणून शब्दांचा अर्थ-बोध करून घेण्याचें काम वाचकाचें आहे. त्यासाठीं शब्दांचे उपयोग व शब्दांच्या शक्ती यांचें त्याला निस्संदिग्ध ज्ञान पाहिजे. मुख्यतः शब्दांत दोन प्रकारच्या शक्ती आहेत : बुद्धीला विचार किंवा कल्पना सुचविण्याची व हृदयांत विकार किंवा भावना उमटविण्याची. 'गुलाब' या शब्दाच्या योगानें विशिष्ट फुलाच्या रंगाचा, वासाचा पाकळ्यांच्या आकाराचा व रचनेचा बोध बुद्धीला होतो. गुलाब या वस्तूचें स्वरूप स्पष्ट करणारे विचार बुद्धीला सुचविण्याची कामगिरी 'गुलाब' हा शब्द करूं शकतो. पण त्याबरोबरच गुलाब या फुलाच्या डौलदारपणाचें कौतुक, त्याच्या सुगंधानें होणारा आनंद, त्याच्या कांटेरीपणामुळें वाटणारा विषाद, इत्यादि भावनांची प्रतीति 'गुलाब' या शब्दाच्या वाचनानें वाचकाला होऊं शकते. या प्रकारचें विचारप्रवर्तन व भावनाप्रवर्तन विशिष्ट शब्दांच्या वाच्यार्थावर आधारलेलें आहे. 'गुलाब' या शब्दाचा वाच्यार्थ एक विशिष्ट प्रकारचें फूल हा आहे. वर उल्लेखिलेले विचार आणि भावना या वाच्यार्थाशीं निगडित आहेत. बाह्य सृष्टींत असणारी एक वस्तु—गुलाबाचें फूल ही त्या विचार विकारांचें अधिष्ठान आहे. शब्दानें प्रवर्तिलेले विचार व भावना यांचे अन्योन्य संबंध व प्रमाण लेखकाच्या उद्देशावर अवलंबून आहेत.

## 'गुलाबा'चे सूचक व प्रतीकात्मक अर्थ

शब्दांचे वाच्यार्थ महत्त्वाचे आहेत. पण त्यापेक्षांही शब्दांचे लाक्षणिक व सूचक अर्थ अधिकच महत्त्वाचे आहेत. वाङ्मयाचें वैशिष्ट्य शब्दांच्या सूचकतेनेंच सिद्ध होतें. 'गुलाब' या शब्दाचा वाच्यार्थ निस्संदिग्ध व एकच आहे; पण त्याचे सूचक अर्थ संदिग्ध व अनेक आहेत. 'गुलाब' या शब्दाच्या वाचनानें यौवनसुलभ प्रणय, शरीरसौष्ठव, भावनामयता, आत्म्याचें सौंदर्य किंवा शुचिता, जडदेहाची भगुरता इत्यादी कल्पना मनांत येतात. या कल्पना गुलाबाच्या फुलाचा रंग, वास, डौल वगैरे विशिष्ट गुणांवरून सुचल्या असल्या तरी गुलाबाच्या फुलाबद्दल कांहीं माहिती देणें हें त्यांचें कार्य नाहीं. मानवी जीवनांतील कांहीं अनुभव, आकांक्षा, भावना यांचें स्पष्टीकरण करणें हें त्यांचें कार्य आहे. फुलाचा लक्षणात्मक उपयोग केल्यानें स्पष्टीकरणाचें कार्य सोपें होतें. कधीं कधीं विशिष्ट कल्पनेचें प्रतीक म्हणूनही त्याचा उपयोग केला जातो. लिखाणाच्या संदर्भांत या लाक्षणिक किंवा प्रतीकात्मक अर्थांपैकीं एक विशिष्ट अर्थ जरी प्रामुख्यानें अभिप्रेत असला तरी इतर अर्थही कांहीं प्रमाणांत सूचित असतात्. शब्दाच्या अर्थवाहक तारांवर एकाच वेळीं बोटें ठेवून लेखक त्यांतून संवादी सूर काढतो. यामुळें संदिग्धता हा लाक्षणिक अर्थानें वापरल्या जाणाऱ्या शब्दांचा दोष नसून गुण आहे. या उलट संदिग्धता हा वाच्यार्थानें वापरल्या जाणाऱ्या शब्दांचा दोष आहे.

'गुलाब' हा शब्द वाच्यार्थानें वापरला असतांही जर वाचकाच्या मनांत विचार व भावना उमटतात, तर तोच शब्द सूचक अर्थानें वापरला असतांना वर दिग्दर्शित केलेल्या कल्पनांशीं संलग्न असलेल्या विविध भावना वाचकाच्या मनांत उमटतील हें उघड आहे. किंबहुना, सूचकतेनें वापरलेल्या शब्दानें प्रेरित केलेले विचार किंवा कल्पना या केवळ बुद्धिगम्य किंवा शास्त्रीय नसून भावनामय असतात. 'गुलाब' या शब्दानें सुचविलेली यौवनसुलभ प्रणयाची कल्पना निर्विकार नाहीं. प्रणयाच्या अनुभवांत सामावलेली आतुरता, बेहोष करणारा आनंद, हळवी असूया, उत्कट प्रेम इत्यादि भावनांनीं ती फुललेली आहे. विचार आणि विकार, कल्पना आणि भावना या द्वंद्वांतील प्रत्येक घटकाचा वेगळेपणा नाहींसा होऊन भावनामय विचार किंवा कल्पनामय विकार या स्वरूपाचा द्वंद्वातीत अर्थ वाचकांच्या मनांत सूचित होतो. उत्तम काव्याचें लक्षण सांगतांना कोलरिज हा गहन विचार आणि उत्कट भावना, बुद्धि आणि हृदय



अनुक्रमणिका

यांच्या ऐक्यावर जो पुनः पुनः भर देतो, त्याचें मर्म हेंच.[2] उत्तम काव्यांत शब्द केवळ विचारप्रवर्तक किंवा केवळ भावनाप्रवर्तक नसतात. विचार आणि भावना यांना ते एकजीव करतात.

## नादाला अर्थनिरपेक्ष स्थान आहे का ?

ज्या शक्तींच्या योगानें शब्द कार्यक्षम होतात त्यांत शब्दांच्या नादाला किंवा आवाजाला महत्त्वाचें स्थान दिलें जातें. शब्दांचे अर्थ आणि आवाज या दोहोंचाही उपयोग कुशल लेखक करितो, विशेषतः भावनाप्रवर्तनासाठीं तो शब्दांच्या नादांची योजना करितो, या प्रकारचीं विधानें नेहमीं केलीं जातात. स्थूलमानानें हीं विधानें खरीं असलीं तरी शब्दांच्या आवाजांना अर्थनिरपेक्ष असें स्वतंत्र स्थान नाहीं हें लक्षांत ठेविलें पाहिजे. शब्दाला विशिष्ट अर्थ ( वाच्यार्थ आणि सूचक अर्थ ) आहेत म्हणूनच त्यांचा आवाज भावनाप्रवर्तक होऊं शकतो. शब्दांचे आवाज संगीतांतील स्वरांपेक्षां भिन्न आहेत. संगीतांतील स्वर स्वभावतःच भावनाप्रवर्तन करितात. वाङ्मयांतील शब्दांचे आवाज शब्दार्थांच्या अनुरोधानें भावनाप्रवर्तन करितात. "हा तालतरू गंभीर शांतता धरी " ( चांदरात ) या ओळींत जी ध्यानानुकूल शांतता व्यक्त झाली आहे ती शब्दांच्या अर्थपरोक्ष आवाजामुळें नाहीं. दीर्घस्वरांचें प्राधान्य, मृदु व्यंजनांच्या बैठकीवर तकाराचें आवर्तन, "गंभीर शांतता " या शब्दसमूहांत अनुनासिकांचें कार्य—या केवळ आवाजविशेषांना स्वतंत्र शक्ति असती तर 'तालतरू'—बद्दल ' तायतळू ' व ' गंभीर शांतते '-बद्दल ' कंबील सांतता ' वापरून इष्ट भाव व्यक्त व्हावयास पाहिजे होता. तालतरू, गंभीर शांतता, या शब्दांना विशिष्ट अर्थ आहेत; म्हणूनच त्यांचे आवाजही सार्थ होतात. आय्. ए. रिचर्ड्सनें आपल्या ' Practical Criticism ' या ग्रंथांत ज्या अनेक हेत्वाभासांचा निरास केला आहे त्यांतील एक महत्त्वाचा हेत्वाभास ' शुद्ध अर्थनिरपेक्ष आवाज ' ( pure sound fallacy ) हा आहे.[3] शब्दांच्या आवाजांना स्वतंत्र कार्यक्षमता नाहीं. तसेंच आपल्या विशिष्ट आवाजांमुळेंच शब्द भावनाप्रवर्तक होतात हेंही तितकेंसें खरें नाहीं. अर्थ हे विचारप्रवर्तक व नाद किंवा आवाज हे भावनाप्रवर्तक अशी वांटणी तर्कशुद्ध भासली तरी वाङ्मयाच्या स्वरूपाला धरून नाहीं. आवाज आणि अर्थ यांचें सहकार्य इतकें दृढ आहे कीं त्यांचें पृथक्करण शक्य नाहीं व उद्बोधकही होणार नाहीं. शिवाय वाङ्मयांत अभिप्रेत असलेले विचार केवळ बौद्धिक नाहींत व भावना केवळ हार्दिक नाहींत, ही कल्पना मान्य झाल्यावर आवाज—अर्थ ही विभागणी अनवाश्यक वाटेल.

## कविता म्हणजे एक अविभक्त शब्द

विवेचनाच्या सोयीसाठीं विवक्षित शब्दांचे उपयोग व शक्ति यांचा विचार केल्यामुळें लिखाणांत जणूं कांहीं प्रत्येक शब्दाला स्वतंत्र अस्तित्व आहे व

---

2 " ... A more than usual state of emotion, with more than usual order; judgement ever awake and steady self-possession, with enthusiasm and feeling profound or vehement."

—*S. T. Coleridge : Biographia Literaria*, ch. XIV

" ... The union of deep feeling with profound thought. "

—*Ibid*, ch. IV

3 " ... The rhythm inherent in the sequence of the actual sounds in verse ... is very important ... But it cannot be judged apart from the sense and feeling of the words out of which it is composed nor apart from the precise order in which that whole of sense and feeling builds itself up. "

—*I. A. Richards : Practical Criticism*, ( page 230 )



अनुक्रमणिका

वैयक्तिक शब्दांच्या अर्थांची बेरीज म्हणजे वाङ्मय अशी गैरसमजूत होण्याचा संभव आहे. वाङ्मयाचा मूळ अर्थ बोल किंवा उद्गार आहे हें लक्षांत ठेविलें म्हणजे, शब्द, शब्दसमूह, वाक्य, ओळ, वाक्यसमूह, हे वाचकाच्या सोयिसाठीं केलेले विभाग (units) आहेत, याची जाणीव राहील. पहिल्या ओळींतील पहिल्या अक्षरापासून शेवटच्या ओळींतील शेवटल्या अक्षरापर्यंत सबंध कविता म्हणजे एकच अविभक्त शब्द, एकच उद्गार आहे, या बेनेडेट्टो क्रोचेच्या मतांतील हटवादाचा भाग सोडला तर तें उद्बोधक होण्यासारखें आहे.[4] शब्दामागून येणारा शब्द आधींच्या शब्दांचें अर्थस्वरूप पालटीत असतो. म्हणूनच योग्य शब्दांच्या योग्य रचनेचें महत्त्व आहे. कवीला जें म्हणावयाचें आहे तें, वैयक्तिक शब्द किंवा त्यांच्या अर्थांची बेरीज या स्वरूपाचें नसून, सूत्रबद्ध शब्द व त्यांच्या परस्परप्राक्रियांतून परिणत होणारा अर्थ, या स्वरूपाचें आहे. शब्दामागून येणारे शब्द ज्याप्रमाणें एकमेकांचे अर्थ बदलतात त्याप्रमाणें एकमेकांचे आवाजही बदलतात. म्हणून वाङ्मयांत वैयक्तिक शब्दांच्या आवाजाला जें महत्त्व आहे त्यापेक्षां जास्त महत्त्व शब्दसमूहांच्या आवाजाला आहे. आवाजामुळें शब्दाची अर्थक्षमता वाढते, अर्थ आणि आवाज यांचें अविभक्त सहकार्य होतें, हें लक्षांत ठेवलें म्हणजे शब्दसमूह, वाक्य इत्यादी लेखविभागांत उमटणारी आवाजाची निम्नोन्नतता (rhythm) व कवितेंत आवश्यक असणारी छन्दोबद्धता (metre) या नादविशेषांचें महत्त्व पटतें. वैयक्तिक शब्दांच्या नादविशेषांप्रमाणें, शब्दसमूहांचे नादविशेषही अर्थानुकूल व विचार-भावनाप्रवर्तक असतात.

## शास्त्रीय सत्य आणि वाङ्मयीन सत्य

वाङ्मयाच्या शाब्दिक स्वरूपाची चिकित्सा सुरू करितांना, शब्दांच्या मुख्यतः दोन शक्ती आहेत असें म्हटलें होतें. शब्द विचारप्रवर्तक आणि भावनाप्रवर्तक आहेत. विशिष्ट लिखाणाचें स्वरूप शास्त्रीय आहे कीं वाङ्मयीन आहे हें ठरवितांना लेखक शब्दांच्या कोणत्या शक्तीचा किंवा शक्तींचा उपयोग करतो याचें परीक्षण करावें लागतें. शब्दांचे वाच्यार्थ वापरून, केवळ बुद्धीला अनुलक्षून, लेखक जेव्हां सृष्टींतील एक वस्तु म्हणून आपल्या लेखनविषयाचें विवरण करतो तेव्हां त्याचें लिखाण शास्त्रीय होतें. वर्ण्य वस्तु अँड्रोमीडासारखा एक तारकापुंज असेल किंवा विशिष्ट व्यक्तीच्या मनांतील विशिष्ट कालखंडांतील संज्ञाप्रवाह असेल, 'डेक्कन ट्रॅप' असेल किंवा हिटलरच्या आत्मचरित्रांत व्यक्त झालेला ज्यू-द्वेष असेल. शास्त्रीय लेखक त्या वस्तूचें तर्कशुद्ध, वास्तविक, भावनारहित, आत्मनिरपेक्ष वर्णन करील. हिटलरच्या ज्यू द्वेषाबद्दल त्याला येणारी चीड, त्या द्वेषाची त्याला स्वतःला लागलेली झळ, हिटलरबद्दल त्याच्या मनांत येणारे भाव-विचार-तरंग इत्यादी आपले मनोव्यापार तो अप्रस्तुत म्हणून वर्ज्य करील. कारण, हिटलरचा ज्यू-विद्वेष ही एक सृष्टींतील घटना आहे, एक स्वयंसिद्ध वस्तु आहे, या दृष्टीनें तिचें वर्णन, पृथक्करण, कार्यकारण-दिग्दर्शन करणें, हा त्याचा उद्देश आहे. 'त्या घटनेबद्दल मला काय वाटतें, तिचा माझ्या जीवनावर, चारित्र्यावर किंवा ध्येयावर काय परिणाम झाला' या आत्मवृत्तपर निवेदनाला निमित्त म्हणून त्या घटनेचा उपयोग करणें हा त्याचा उद्देश नाहीं. 'आहे हें असें आहे' या प्रकारचें सत्यकथन

---

4 "We must consider as 'a word' the whole book or the whole discourse, from the first word to the last, including all that in it may seem accidental or superficial including even the accent, the warmth, the emphasis, the gestures of the living word, the rotes, the parentheses, the full stops and commas of the written."

— *Benedetto Croce : Logic*

शास्त्रीय लिखाणांत करावयाचें असतें. वाङ्मयांतही सत्यकथन असतें. वाङ्मयीन सत्य व शास्त्रीय सत्य यांचे परस्परसंबंध हा वाङ्मयीन टीकेंतील एक गाजलेला विषय आहे. येथें इतकेंच म्हणावयाचें आहे कीं वाङ्मयातील सत्यकथनाला ' कसें असावयाला पाहिजे ' या स्वरूपाची प्रकट किंवा अप्रकट ध्येयवादी बैठक असते. ' कसें असावयाला पाहिजे ' या प्रश्नाचें उत्तर प्रत्येक लेखक स्वतःचे अनुभव, स्वतःला पटणारा जीवितमूल्यांचा गुणक्रम, स्वतःची जीवितसाफल्याची कल्पना इत्यादी वैयक्तिक गोष्टींच्या अनुरोधानें देईल आणि त्याच्या व्यक्त किंवा अव्यक्त उत्तराचे पडसाद त्याच्या वास्तववादी लिखाणांतही उठतील. वाङ्मयांत उमटणारे शोक, उद्वेग, कारुण्य, उपरोध इत्यादी भाव वास्तव आणि इष्ट यांतलि विरोधाच्या जाणिवेनें प्रेरित केलेले असतात.

आपल्या लेखनहेतूच्या पूर्तीकरितां शास्त्रीय लेखकाला शब्दांचा उपयोग काटेकोर निःसंदिग्धतेनें करावा लागतो. शब्दांच्या भावनाप्रवर्तक शक्ती बधिर करून त्यांच्या केवळ बुद्धिप्रेरक, विचार-प्रवर्तक शक्तींचा उपयोग करणें शास्त्रीय लेखनांत जरूरीचें असतें. ' डेक्कन ट्रॅप 'चें शास्त्रीय वर्णन करतांना ' दाक्षिण ' या शब्दानें उचंबळूं लागणारें देशप्रेम व ' काळा फत्तर ' या शब्दानें सूचित होणारी निर्दय, हृदयशून्य वृत्ति इत्यादी अप्रस्तुत मनोव्यापारांना बंध घातला पाहिजे. शब्दांच्या बुद्धिगम्य वाच्यार्थावरच केवळ भर दिल्यानें हे हेतू सिद्ध होऊं शकतात. आधुनिक विज्ञानाचें उगमस्थान असलेल्या १७ व्या शतकांत स्प्रॅट, ड्रायडन वगैरे ' रॉयल् सोसायटी 'चे सभासद शब्दांचे तर्कशुद्ध व निस्संदिग्ध अर्थ ठरविण्यांत कां गुंतलेले होते याचा उलगडा शास्त्र व शब्दांचे वाच्यार्थ यांचे निकट संबंध ओळखण्यानें होण्यासारखा आहे.[5] बेकनसारखा आधुनिक विज्ञानाचा तात्त्विक प्रणेता सुद्धां शब्दांच्या सूचक अर्थांच्या मोहजालांत पडून अशास्त्रीय विधानें करीत असे हें लक्षांत ठेवलें म्हणजे शब्दांचे वाच्यार्थ स्पष्ट करण्याची जरूरी पटेल.

## वाङ्मयीन शब्द सर्वगामी

वाङ्मयीन लेखनाचे हेतू निराळे. लेखकाच्या वैयक्तिक मनोवृत्तींचा, विचार-विकारांचा सर्वांगीण आविष्कार त्याच्या लिखाणांत व्हावयाचा असतो. म्हणून शब्दांच्या सर्व शक्तींचा उपयोग त्याला करावा लागतो. केवळ वाच्यार्थावरच भर दिला तर शब्द खुरटे, सत्त्वहीन होतात; विविध मनोव्यापारांचा ठसा उठविण्यास असमर्थ होतात. शास्त्रीय लिखाणांतील शब्द रुळांवरून धावणाऱ्या आगगाडी-प्रमाणें एकमार्गी असतात. वाङ्मयीन लिखाणांतील शब्द हवेंतील ध्वनिलहरींप्रमाणें बहुमार्गी व सर्वगामी असतात. कोलरिज म्हणतो त्याप्रमाणें वाङ्मय हें जर मानवी मनाच्या वृत्तिसर्वस्वाचें स्पंदन (the whole soul of man in activity) असेल तर वाङ्मयांत शब्दांच्या शक्तिसर्वस्वाचा उपयोग करून घेणें जरूरीचें आहे. वाङ्मयाला पूर्णार्थानें शब्दसृष्टि म्हणून संबोधण्याचें औचित्य वाङ्मयांत होणाऱ्या शब्दांच्या सर्वांगीण उपयोगानें सिद्ध होतें.

---

5 " They ( the Royal Society ) have extracted from all their members, a close, naked, natural way of speaking; positive expressions, clear senses; a native easiness, bringing all things as near the mathematical plainness, as they can. "

*— Thomas Sprat : History of the Royal Society*





अनुक्रमणिका

# निदान एवढं तरी कर....

कोळिष्टकांनीं भरलेल्या
मेंदूत किडे खदखदूं लागावे अशा किळसवाण्या घाणीनें माखलेल्या
पडक्या झडक्या सराईत—
अगदीं घट्ट डोळे मिटून
पायांची जुडी करून
कपाळाला हात लावून
किती युगें बसणार आहेस ?

काय करूं मीं ?
सराईबाहेर, आजूबाजूला, खालींवरतीं
अंधकारानें साकारता घेतली आहे.
त्याच्या देहावर विजेच्या नागिणी खेळत आहेत
आणि तो आ वासून
मला गिळायला अगदीं सज्ज होऊन बसला आहे.
सराईबाहेर पडलों तर माझीं कांहीं धडगत नाहीं.

पण....
उठून उभा तरी राहा
दीर्घश्वास घेऊन
मान ताठ करून
वर तर पाहा.
कदाचित—
एकाद्या मोहिनीच्या स्वरूपानें वेडा होऊन
तिच्यासारखेंच पदन्यास करीत करीत
स्वतःच्याच डोक्यावर हात ठेवून
अंधकाराचा असुर
भस्म होत असलेला तुला दिसेल
आणि प्रकाशाचें संरक्षक कमल
सर्व विश्वावकाशाला झांकून टाकतांना



अनुक्रमणिका

## निदान एवढं तरी कर....

तुला आढळेल.
ऊठ उभा रहा. वर तरी पहा.
उगीच कशाला कपाळाला हात लावून किड्यासारखा या
घाणींत वळवळतोस ?
भीति वाटते तुला ? अजून सुद्धां ?
मग एवढं तरी कर—
बागुलबुवाच्या भीतीनें गांगरून गेलेलें बालक
आईच्या कुशीच्या दुर्गांत दडल्यानंतर
जसें हळूच आपले डोळे किलकिले करतें
तसें तरी कर माझ्या कुशींत लपून.
पण....
डोळे किलकिले करून का होईना
आजूबाजूला सराईच्या बाहेर
डोळे किलकिले करून का होईना
एकदां तरी पहा
एकदांच पहा....

—श्री. य. द. भावे

---

### भारताचें परराष्ट्रीय धोरण—

आपलें परराष्ट्रीय धोरण आंखतांना आपल्या ' उच्च स्वार्थां ( enlightened self-interest )'चा भारतानें जरी विचार केला असला तरी त्याबरोबरच ध्येयवादी दृष्टिही सोडलेली नाहीं. राष्ट्राचें हित आणि ध्येयवाद यांचा समन्वय साधण्याचा भारतानें प्रयत्न केला आहे. आमच्या परराष्ट्रीय धोरणाचें ध्येय सांगायचें झालें तर तें असें आहे : कोणत्याही एका राष्ट्राची व राष्ट्रसमूहाची बाजू न घेतां प्रत्येक वादग्रस्त मुद्द्याबाबत स्वतंत्रपणें विचार करून शांतता प्रस्थापित करण्याचा प्रयत्न करणें; गुलामगिरींत खितपत पडलेल्या लोकांना स्वतंत्र करणें; राष्ट्राचें त्याचप्रमाणें व्यक्तींचें स्वातंत्र्य अबाधित ठेवणें; वंशविषयक पंक्तिप्रपंच नष्ट करणें; जगांतील बहुतेक भागाला ददात, रोगराई आणि अज्ञान यांनीं पछाडलें आहे, त्यांतून तेथील लोकांना मुक्त करणें.

—पं. नेहरू, कोलंबिया युनिव्हर्सिटीपुढें केलेल्या भाषणांतून, ( १७-१०-४९ ).

### ' विदग्ध वाङ्मय '

मला एकानें विचारलें, " तुमच्या आवडीचीं तीन सर्वोत्तम पुस्तकें कोणतीं ? " मी सांगितलें, " भगवद्गीता, इसापनीति आणि युक्लिडची भूमिति. " ऐकणाराला हें उत्तर अनपेक्षित होतें. पण मी हीं तिन्हीं विदग्ध वाङ्मयाचीं उत्तम उदाहरणें समजतों.

—आचार्य विनोबा
' सेवक ', ऑगस्ट १५ वरून





अनुक्रमणिका

# नागरी लिपि आणि तिचें मुद्रण ★

एक मुद्रणशास्त्रीय दृष्टिकोण

लेखक : श्री. शि. का. संत,
प्राध्यापक, अक्षर-मुद्रण गव्हर्नमेंट ॲप्रेंटिस् स्कीम, व्ही. जे. टी. इन्स्टिटयूट, मुंबई.

## लिपिसुधारणा–समिति

मुंबई सरकारनें मराठी ( बालबोध ) नि गुजराथी या दोन्हीं लिप्यांमध्यें मुद्रण, लेखन, वाचन, टेलीप्रिंटर इत्यादी बाबतींत सुकरता येण्याच्या दृष्टीनें कसकशा सुधारणा करतां येणें शक्य आहे, आणि मराठी-गुजराथी या दोन्हीं लिप्यांचें संयोगीकरण करून एक समान लिपि शोधून काढणें कितपत इष्ट आहे याचा विचार करण्याकरितां श्री. काकासाहेब कालेलकर यांच्यासारख्या अनुभवी, दोन्हीं भाषांचें चांगलें ज्ञान असलेल्या विद्वान् गृहस्थांच्या अध्यक्षतेखालीं तज्ज्ञांची एक समिति नुकतीच नेमली असल्याचें सर्वश्रुतच असून, प्रस्तुत समितीला या बाबतींत आपलें निवेदन लवकरच सरकारला सादर करावयाचें आहे. अशा वेळीं तर्कशुद्धता, व्यवहार नि सुकरता इत्यादी गोष्टी विचारांत घेऊन या प्रश्नाचा ऊहापोह होणें अत्यावश्यक आहे; आणि तोच येथें करावयाचा आहे.

## गुजराथी आणि मराठी लिपींचें संयोगीकरण

समितीपुढील उद्दिष्टांचा विचार करतां अखेरचा पण अत्यंत महत्त्वाचा नि वादाचा प्रथमच मुद्दा अशा विचारांत येतो कीं मराठी आणि गुजराथी यांचें संयोगीकरण करून एक निराळीच तिसरी लिपि प्रचारांत आणणें कितपत शक्य आहे ? या मुद्द्यावर कदाचित् अत्यंत तीव्र मतभेदहि निर्माण होणें अपरिहार्य आहे. त्या दृष्टीनें प्रथम हा शेवटचाच मुद्दा विचारांत घेऊन नंतर इतरांचा परामर्श घेऊं.

वस्तुतः मराठी-गुजराथी या दोन्हीं लिप्यांसाठीं एक संयुक्त लिपि तयार करणें शक्य आहे का, या प्रश्नाचें उत्तर विनोद बाजूला ठेवून एका दृष्टीनें "होय" असें निश्चित म्हणतां येईल, तर भावनेचा आवेग मोठा झाल्यास "नाहीं" असेंहि म्हणावें लागेल. "होय" हें उत्तर अशा अर्थानें म्हणतां येईल कीं सध्यां मराठी भाषेनें आत्मसात् केलेली देवनागरी लिपि गुजराथी भाषेसाठींहि वापरण्याचें

---

भावी टाइपाचें वळण कसें असावें याचें निदर्शन करणारा ब्लॉक लेखकानें तयार करविला असून तो प्रस्तुत लेखाच्या शीर्षकासाठीं वापरला आहे. त्याप्रमाणेंच छोट्या टाइपाचें वळण निदर्शित करणारा लेखकानें तयार करविलेला दुसरा ब्लॉक या लेखाच्या शेवटच्या पानावर वापरला आहे.

—का. सं.

ठरलें तर; आणि भावनेच्या अधीन होऊन गुजराथी भाषिकांनीं तसें करण्याचें नाकारलें तर या प्रश्नाचें सरळ उत्तर "नाहीं" असेंच निघणार !

तथापि हा 'होकार' नि 'नकार' यांचा परिच्छेद देऊन या बाबतींत तिसरा एक पर्याय सुचविला जाणें अगदीं शक्य आहे. आणि तो म्हणजे "तुमचेंहि थोडें सोडून द्या आणि आमचेंहि थोडें सोडूं, आणि अशा तऱ्हेनें एक संयुक्त लिपि आपण महाराष्ट्र नि गुजराथ यांच्यापुढें ठेवूं" हा विचार समितीचे अध्यक्ष श्री. काका कालेलकर यांना व्यक्तिशः अधिक पसंत पडेल अशी कल्पना येते. कारण मराठी–गुजराथी भाषिकांचें एकीकरण करण्याची त्यांची दुर्दम्य इच्छा, या दोन्ही भाषांविषयीं त्यांना वाटणारी आत्मीयता आणि लिपिसुधारणेसाठीं त्यांनीं आजपर्यंत घेतलेले अत्यंत परिश्रम, केलेले अनेक प्रयोग इत्यादी गोष्टी झटकन् आपल्या नजरेसमोर येतात.

हा तिसरा पर्याय असा निघणें शक्य आहे कीं, आज जी देवनागरी लिपि मराठी भाषा वापरीत आहे तीच यापुढें शिरोरेषा टाळून वापरावी, व देवनागरी–गुजराथी यांच्या अनेक शब्दांत अगदीं सारखेपणा असल्यानें गुजराथी भाषिकांनींहि शिरोरेषाविरहित देवनागरी लिपि यापुढें उपयोजावी. श्री. काकासाहेब कालेलकर यांनीं अत्यंत परिश्रम घेऊन शिरोरेषांविरहित तयार केलेले अनेक टाईप, त्यांची समितीच्या अध्यक्षस्थानीं झालेली निवड आणि हा पर्याय, यांची आपण सांगड घालूं गेल्यास वरील विचार आपल्यापुढें येणें अगदीं अपरिहार्य आहे असें वाटतें.

## शिरोरेषा नि वाचनाची सुकरता

पण शिरोरेषा टाळून आपली नागरी लिपि वापरणें इष्ट आहे का, त्याच्या योगें लिपीस सुवाच्यता अधिक येणें शक्य आहे का हेंहि बारकाईनें आपण प्रथम विचारांत घ्यावयास हवें.

आपल्या भूमितीच्या शिक्षकांनीं आपणांस लहानपणींच शिकविलें कीं, "A point has an imaginary postion and a line is a point in motion."—ज्याला स्थिति आहे पण महत्त्व नाहीं त्याला बिंदु म्हणतात आणि रेषा ही गतिमान् बिंदूचें निदर्शन करीत असते. भूमितिशास्त्रांतील हा साधा नियम लिपीच्या उभारणीसाठीं अत्यंत महत्त्वाचा नि विचारार्ह आहे. या नियमानुसार वाचतांना एक एक अक्षर अवलोकून दृष्टीला भराभर पुढें खेचण्याचें काम रेषा करीत असते. पुस्तकांतील एखादी ओळ वाचतांना नेहमीं आपली दृष्टि या रेषेच्या अनुरोधानें धांवत असते आणि या रेषेमुळेंच वाचनाची सुकरता सहजसाध्य होते. टाईप पाडण्यामध्यें 'लाईन' ला जें अत्यंत महत्त्व आलें आहे तें यामुळेंच. इंग्रजीमध्यें 'सेरिफ्स्' हीं टाइपांना निष्कारण दिलेलीं केवळ ठिगळें नव्हत तर त्या आपली दृष्टि भराभर पुढें खेचण्याचें काम व्यवस्थितपणें पार पाडतात. यासाठीं इंग्रजीमध्यें सेरिफरहित टाईप ग्रंथमुद्रणाच्या कामांत त्याज्य ठरविले आहेत. एक काळ असा होता कीं 'सेरिफ्स्' हीं टाइपांना दिलेलीं ठिगळें आहेत असा समज होऊन त्याची परिणति 'Sans Serif' (सेरिफरहित) टाइपांतहि झाली; पण त्यांतील सुवाच्यतेची कमतरता ध्यानीं येतांच 'Slab Serif' (जाड सेरिफ) असलेलीं अक्षरेंहि लागलींच निर्माण झालीं आणि सुवाच्यतेची उणीव भरून काढली गेली. इत्यर्थ इतकाच कीं, नागरी लिपींतील शिरोरेषा ही वाचनाची सुकरता निश्चित वाढवीत असतांना, शास्त्रशुद्ध दृष्टीनें तिची जरूरी असतां आपल्या भावी लिपींत ही सुकरता घालवून टाकणें इष्ट आहे का ?

'सान्स सेरिफ' टाइपांत किंवा नवीन शिरोरेषाविरहित लिपींत प्रत्यक्ष दिसणारी रेषा नसली तरी एक अदृश्य ही रेषा राहणारच आहे असा युक्तिवादहि केला जाण्याची शक्यता वाटते; आणि त्याच्या उत्तरासाठीं आपणांस आणखी खोलांत जाणें जरूर झालें आहे.

लिपि आणि आपली दृष्टि यांची चांगलीच सांगड आपणांस घालावी लागते. वाचतांना आपल्या दृष्टीचा ओघ साधारणतः अक्षरावरून नेहमीं वरून खालीं येत असतो; म्हणजे 'भ' हें अक्षर घेतलें तर आपली दृष्टि प्रथम गांठ अवलोकिते व शेवटीं रेषेच्या टोकाला येते आणि नंतर पुन्हा







अनुक्रमणिका

कान्यावरून उलट शिरोरेषेच्या अनुरोधानें पुढील अक्षराकडे वळते. इंग्रजीमध्यें वरून खालीं येण्याऱ्या ओघवती दृष्टीचा तात्त्विक दृष्ट्या चांगलाच उपयोग करून घेतला आहे. कारण तिच्यांत 'लाईन' ही खालीं घेतलेली आहे. त्यामुळें सेरिफविरहित अक्षरें जरी असलीं तरी तीं अदृश्य रेषेकरवीं दृष्टीला अक्षरांवरून पुढें पुढें नेण्याला फारसा अडथळा आणीत नाहींत. मराठीमध्यें दृष्टीचा ओघ वरून खालीं नि रेषा वर आणि तीहि अदृश्य राहिली तर वाचनाची सुकरता निश्चितपणें कमी होईल; कारण दृष्टीला त्या ठिकाणीं दरडीवरून उड्या मारीत मारीत जाण्याची कसरत करावी लागेल. तेव्हां शिरोरेषा आपलें काम योग्य तऱ्हेनें करीत असतां आपण ती काढून टाकावी का? आणि वाचकांच्या डोळ्यांवर निष्कारण ताण पाडण्याला कारणीभूत कां व्हावें? सारांश देवनागरीमधील शिरोरेषा ही एक अत्यंत जरूरीची बाब आहे, ती अडगळ म्हणून वापरलेली नाहीं हें निसंदिग्धपणें पुढें मांडणें जरूर वाटतें.

## मराठीची मूळ लेखन-लिपि

हिंदुस्थानांतील चारी महत्त्वाच्या भाषा हिंदी, मराठी, गुजराथी आणि बंगाली यांची जननी संस्कृत हीच निश्चित आहे आणि या चारी भाषिकांना संस्कृतचा नितांत अभिमानहि आहे. या भाषांपैकीं हिंदीनें संस्कृतसाठीं वापरली जाणारी देवनागरी लिपि (५—६ अक्षरें खेरीज करून) लेखनासाठीं उपयोजिण्याचें ठरविलें; पण इतर तिन्ही भाषिकांनीं मात्र आपल्या निराळ्या लेखनलिप्या उपयोगांत आणल्या. मराठी भाषा आज वापरींत असलेली देवनागरी लिपि वस्तुतः मराठीची मूळ लेखनलिपि नव्हेच! संस्कृतच्या सतत अभ्यासामुळें त्या लिपीची तिला अधिक आपुलकी वाटली इतकेंच. लेखनाच्या सुकरतेसाठीं मराठीनें पूर्वी खरी आपली मानलेली लिपि हेमाडपंती "मोडी". आपल्या जुन्या बखरी, ऐतिहासिक कागदपत्रें, इतकेंच काय पण इंग्रजी-मराठीचा पहिला शब्दकोश डॉ. कॅरेनें श्रीरामपूर येथें छापलेला मोडीमध्येंच होता. लेखनाच्या सुकरतेसाठींच गुजराथीनेंहि आपली मोडीसमान लेखन-लिपि उपयोजिली. गुजराथीमधील कित्येक अक्षरांचें आपल्या मोडीशीं किती साधर्म्य आहे हें आपल्या चटकन् लक्षांत येतें.

मुद्रणपूर्व युगांत मराठी बहुजनसमाज निरक्षर आणि थोड्या शिक्षित समजल्या जाणाऱ्या वर्गाचा संबंध पूर्णतः संस्कृताशींच! वयाच्या आठव्या वर्षापासूनच मुलाला संस्कृतच्या अध्ययनांत गुंतवावयाचें! त्यामुळें साहजिकच देवनागरी लिपि मुलाच्या लहानपणापासूनच "बालबोध" झाली आणि बहुतेकांनीं ती विदग्ध नि धार्मिक वाङ्मयासाठीं वापरण्याचें ठरविलें, त्यामुळें तिचा प्रसारही अधिकाधिक झाला. या उलट मोडीनें जलद लेखनाची जरी गैरसोय दूर केली होती तरीपण ती सुलभ वाचनाची आणि पुढें मुद्रणाची मात्र सोय साधूं शकत नव्हती. त्यामुळें दोन्हीं लिप्यांपैकीं सुवाच्य अशा संस्कृतच्या देवनागरी लिपीला आपण "बालबोध" हें गोंडस नांव दिलें. आधींच संस्कृतचा अभिमान, तशांत वाचनाची नि मुद्रणाची सोय, त्यामुळें मराठीनें आपण होऊन आपली मूळ मोडी लिपि मोडून तोडून फेकून दिली आणि मूळची देवनागरी लिपि एक अवाक्षरहि फरक न करतां लेखनासाठीं सुद्धां जशीची तशी अंगिकारिली.

वस्तुतः आज उद्‌भवलेला संयुक्त लिपीचा प्रश्न सन १८३१ पूर्वी वा त्या सुमारासच प्रामुख्यानें निर्माण झाला होता असें वाटावयास लागतें. कारण त्याच सुमारास हिंदुस्थानांत छापखान्यांची सुरुवात झाली. त्यावेळीं मराठी भाषिकांनीं आपला कौल देवनागरीच्या बाजूनें दिला. कारण त्याशिवाय त्यांना गत्यंतरच नव्हतें. गुजराथी भाषिकांनीं मात्र आपल्या लेखनलिपीचे स्वतंत्र पंच, स्वतंत्र टाईप उपयोजण्याचें आरंभिलें. त्यावेळीं आम्हीं दाखविलेला "शहाणपणा" त्यांनींहि दाखविला असता तर आज हा प्रश्नच उद्‌भवला नसता नि छापखान्यांच्या प्रस्थापनेनंतर ११८ वर्षांनीं रूढि बदलण्याचा प्रसंगच येता ना!

तथापि अजूनहि वेळ गेली नाहीं. गुजराथी भाषिकांनीं अद्यापहि देवनागरी लिपि वापरण्यास हरकत नाहीं. त्यांना ती दुर्बोधहि नाहीं. कांहीं





अनुक्रमणिका

# नागरी लिपि आणि तिचें मुद्रण

गुजराथी काव्यांसाठीं ती वापरली जात आहे ना ! कांहीं जुने भगवतीसूत्रासारखे गुजराथी धार्मिक ग्रंथहि देवनागरींतच आहेत ना ! शालेय पुस्तकांतील घड्यांचीं शीर्षकें कांहीं ठिकाणीं आजहि देवनागरी-मधून आहेतच ना ! पाहिजे तर मराठीची म्हणून तुम्हीं ती वापरूं नका तर तुमची तुम्ही वा स्वतंत्र हिंदुस्थाननें मान्य केलेली देवनागरी लिपि म्हणून वापरा...अनेक भाषांपैकीं एक भाषा राष्ट्रभाषा म्हणून अंगिकारली म्हणजे त्या भाषेचें साम्राज्य इतर भाषांवर प्रभुत्व गाजवण्यास सुरुवात करते, पण एक लिपीचें मात्र तसें होत नाहीं. सर्व पाश्चात्य राष्ट्रांत एकच लिपि वापरली जात आहे, पण कोणावरहि तिचा अन्याय झाल्यासारखा दिसत नाहीं. उलट प्रत्येकानें आपापल्या अभिरुचीनुसार त्या लिपीला निरनिराळीं अलंकारलेणीं देऊन नटविलें आणि लिपीचें सौंदर्य आणि सुकरता निश्चित वाढविली. आम्ही आमची मोडी लिपि अवाच्यतेमुळें टाकून दिली आहे. गुजराथी भाषिकां-नींहि तसें करावयास हरकत नाहीं, त्यांत अपमाना-स्पद असें वाटण्याचें कांहींच कारण नाहीं. एक काळ रोमन लिपीच आपण सर्व भाषिकांनीं वापरावी असा येऊं लागला होता; परंतु तो पूर ओसरला नि देवनागरी लिपि अत्यंत उच्चारानुसारी असल्यानें जास्त जास्त ग्राह्य वाटूं लागली. गुजराथी लिपीच्या वाचनास असुलभपणामुळें गुजराथी भाषिकांमध्येंहि मुद्रणासाठीं देवनागरी लिपीच वापरावी असा विचारप्रवाह निश्चित वाढत आहे. विशेषतः बऱ्याच सुविद्य व्यक्तींचा कल तसा होत आहे असें आढळून येतें; कारण देवनागरी लिपि खरोखरच बालबोध नि प्रगल्भ आहे.

वस्तुतः हिंदुस्थानांत हिंदी भाषिकांची संख्या पुष्कळच मोठी आहे. आणि हिंदी नि मराठी या दोन्ही भाषा एकच लिपि आज वापरीत आहेत. अशा वेळीं देवनागरी लिपि वापरणारा अत्यंत मोठा गट असतांना त्यांत फूट न पाडतां आणखी भर कशी घालतां येईल इकडेच पाहिलें पाहिजे. त्या अनुरोधानें गुजराथी आणि बंगाली या दोन्ही भाषिकांनीं संस्कृतची मूळ देवनागरी लिपि वापर-ण्यास वस्तुतः हरकत नाहीं. या दोन्ही लिप्यांचें देवनागरीशीं मराठीइतकेंच नातें आहे. पहिली पायरी म्हणून कांहीं काळपर्यंत प्रादेशिक लिपि लेखनासाठीं नि देवनागरी लिपि मुद्रणासाठीं वापरण्यास सुरुवात करावी.

## लेखन नि वाचन यांचीं मूल ध्येयें

लिपिसुधारणा समितीपुढील उद्दिष्टांचें ( terms of reference चें ) अवलोकन करतां " वरील लिप्यांचें लेखन आणि वाचन यांमध्यें सुकरता कशी आणतां येईल " हा महत्त्वाचा शब्दप्रयोग आहे. वस्तुतः लेखन आणि वाचन या दोन्हींच्या सुकरतेची गांठ बांधूं पाहणें अवास्तव आहे; कारण दोन्हींचीं मूलध्येयेंच अगदीं भिन्न आहेत. एकींत हाताला कमींत कमी त्रास द्यावयाची इच्छा असते तर दुसरींत दृष्टीला कमींत कमी ताण द्यावयाचा असतो. यामुळेंच इंग्रजीमध्यें लेखनासाठीं आणि मुद्रणासाठीं—म्हणजे वाचनासाठीं दोन स्वतंत्र लिप्या वापरल्या जातात. बालबोध आणि मोडी या मराठीच्या लिप्यांचेंहि तेंच प्रयोजन आहे. आपण लिपीच्या बाबतींत हाताची सुकरता साधूं लागलों तर सुवाच्यतेची विटंबना होते आणि सुवाच्यता साधूं लागलों तर लेखनांत हातांना अधिक श्रम पडतात. मोडी आणि गुजराथी या दोन्ही लिप्यांची प्रस्थापना होण्याच्या वेळीं लेखनाची सुकरता हाच महत्त्वाचा हेतु त्या त्या भाषिकांच्या पुढें होता; पण आज ती परिस्थिति नाहीं. जोंपर्यंत लिपि मुद्रणद्वारें प्रसृत होत नव्हती तोंपर्यंत लेखन-सुलभतेला महत्त्व होतें; पण आतां टंकलेखन आणि मुद्रण हींच अधिकाधिक होऊं लागल्यामुळें वाचन-सुलभतेला आज अधिक महत्त्व आहे. म्हणून लेखनाची सुकरता साधण्यासाठीं वाचनाची दुर्लभता पत्करणें निश्चित अनिष्ट होय. मुद्रणांत शिरोरेषा ठेवावयास पाहिजे ती यासाठींच. या दृष्टीनें गुजराथी भाषिकांनीं आपली गुजराथी लिपि लेखनासाठीं आणि देवनागरी लिपि मुद्रणासाठीं वापरण्यास सुरुवात करणें वरील विवेचनावरून अधिक पटण्यासारखें आहे. त्याचप्रमाणें मराठी भाषिकांपैकीं ज्यांच्यावर लेखनाचें अमर्याद ओझें पडणार आहे, त्यांनीं पाहिजे तर केवळ वैयक्तिक लिखाणापुरती

शिरोरेषाविरहित देवनागरी लिपि वापरावी. कारण त्यांची मोडी लिपि आज नाममात्रच राहिली आहे. आणि तिचा अट्टहासानें पुरस्कार करणेंहि प्रशस्त वाटत नाहीं; कारण तिच्यात अवाच्यतेचे भरपूर अवगुण आढळतात. तथापि इतर सर्व ठिकाणीं शिरोरेषासहित देवनागरी लिपिच वापरणें प्राप्त आहे.

## लिपिसुधारणेचे हेतू आणि मानसिक संकेत

आज लिपिसुधारणेच्या प्रश्नाबाबत असें निश्चित म्हणावेंसें वाटतें कीं लिपिमध्यें मुख्य व महत्त्वाची अशी कोणतीच सुधारणा आज आपणांस नको आहे. कारण आजपर्यंत झालेल्या लिपिसुधारणेच्या यत्नांतून एखादा अपवाद सोडल्यास स्वीकरणीय अशी सुधारणा फारशी कोणी पुढें मांडलेलीच नाहीं. त्यांतून फक्त एकच फरक मान्य झाल्यासारखा दिसतो व तो म्हणजे संस्कृतप्रणीत वरून खालीं जोडाक्षरें जोडण्याची पद्धति आपण आतां बव्हंशीं टाकून दिली असून मुद्रणप्रणीत डावीकडून उजवीकडे जोडाक्षरें जोडण्याची पद्धति सरसहा वापरीत आहों. ही सुधारणा आतां सर्वसंमत झालेली आहे, आणि म्हणून देवनागरींतील हा फरक आतां स्वीकारण्यास प्रत्यवाय नाहीं; पण इतर फरक मात्र असे करूं नयेत असें निश्चित वाटतें. मुख्यतः लिपींत सुधारणा करण्याचे मूल हेतु म्हणजे सुधारणेच्या योगानें टाईप-जुळाईंत अधिक सुकरता यावी, लिपि यंत्रसिद्ध व्हावी, टंकलेखनहि सुकर व्हावें आणि सर्वांबरोबर वाचनाची सुलभता बिघडूं नये. पण याच 'सुधारकां'चें लक्ष पहिल्या तीन मुद्द्यांकडे तें आणि शेवटचा मुख्य मुद्दा उपेक्षिला जातो. केवळ मुद्रणाच्या सोयीसाठीं लिपींत बरेच फरक करणें अनिष्ट व अन्याय्य आहे; कारण सर्वसाधारण लोकांच्या मनांत लिपीसंबंधींचे सांस्कृतिक, मानसिक व दृश्य असे संकेत ठाम बनलेले असतात व ते बदलणें इष्ट नाहीं.

लिपींत सुधारणा करूं चाहणाऱ्या कांहीं व्यक्तींचा देवनागरी लिपिमधील मात्रा, अनुस्वार, उकार, इत्यादी वर खालीं टाकाव्या लागणाऱ्या चिन्हांचें उच्चाटन करून ते अक्षरांच्याबरोबर मध्यभागांत कोठें तरी आणावयाचें असा दिसतो. तसें करण्यांत त्यांचा हेतु हाच कीं टाइपाची जुळाई लवकर व्हावी आणि टाईप यंत्रांवरहि सहज बसावा. पण असें करण्यानें अक्षरांच्या स्वरूपांत बराच फेरबदल होतो आणि तो फरक आजपर्यंत उत्पन्न झालेल्या अगडबंब मुद्रित वाङ्मयापासून बराच विभिन्नहि ठरतो. मग नवीन पिढीला जुनी लिपि अशी व नवी लिपि तशी हें शिकवीत बसणें कितपत इष्ट आहे? ज्ञानेश्वरीपासूनचें सर्व वाङ्मय या नवीन लिपींत पुनर्मुद्रित होणार आहे काय? जुळाईच्या २।४ व्यक्तींच्या १।२ तासांच्या बचतीकरतां लाखों लोकांच्या दृष्टीला त्रास देणें बरोबर आहे काय? तें बोटभर कातड्यासाठीं म्हैस मारण्यासारखें नाहीं का? गुजराथी-वा-अन्यभाषिकांचा सुद्धां लिपि बदलण्यांत विरोध उत्पन्न होतो तो विशेषकरून आजपर्यंत निष्पन्न झालेल्या अगणित वाङ्मयाच्या जाणीवेमुळेंच. तथापि त्यांनीं प्रादेशिक लिपि लेखनासाठीं आणि नागरी लिपि ही मुद्रणासाठीं वापरण्याचें ठरविलें तर तरुण पिढीला दोन्ही लिप्यांचें साहचर्य होऊन कोणताहि तोटा होणार नाहीं. शिवाय राष्ट्रलिपि सर्वांना अवगत असणें जरूरच आहे. पण तिच्याच डोक्यावरचें शिरस्त्राण काढून घ्यावयाचें, मध्यें लक्तरें लोंबतीं ठेवावयाचीं आणि कांहींसें 'अ॒' याला 'इ' म्हणारें असें सांगत बसावयाचें हें कितपत इष्ट आहे? प्राध्यापक फडके यांच्या " 'आओ' या शब्दानें 'आई' या शब्दार्थाची शुद्ध विटंबना होते " या उद्गारांत लिपीनें करून ठेवलेल्या संस्कारांच्या दृष्टीनें खरोखरच एक मोठा अर्थ भरला आहे. ते उद्गार पुच्छप्रगतीचे निश्चित निदर्शक नाहींत. प्रश्न असा आहे कीं मनाचे संकेत, दृष्टीचे संकेत केवळ क्षुल्लक कारणाठीं बदलावयाचे का? मुद्रणाची सुकरता हें क्षुल्लक कारण आहे तर वाचनाची सुलभता हें महत्कारण आहे. मुद्रणाचा मूलहेतु हाहि वाचनाची जास्तींत जास्त सुलभता साधणें हाच आहे. लिपींत फेरबदल करण्यानें मुद्रणाची सुकरता साधली तरी वाचनाची सुलभता साधली तरी वाचनाची सुलभता साधली. जात नाहीं तर मुद्रणाच्या मूल हेतूचेंच विध्वंसन होतें. म्हणून





अनुक्रमणिका

# नागरी लिपि आणि तिचें मुद्रण

लिपींत महत्त्वाचे फेरबदल निश्चित नकोत असें निःसंदिग्धपणें म्हणावेंसें वाटतें.

## देवनागरीची यंत्रसिद्धता

लायनो-टाईप यंत्रावर नागरी लिपि श्री. गोविल यांच्या प्रयत्नानें वस्तुतः बरेच दिवसांपासून बसाविली गेली आहे. पण तसें करण्यांत लिपिमध्यें मनास व दृष्टीस न मानवतील असे बदल केले गेल्यामुळें लिपि यंत्रावर बसवूनहि कोणी फारसें वापरीनासें झालें आहे. याचें मुख्य कारण हेंच कीं सर्वसामान्य जनता लिपिसंबंधींचे संकेत टाकून द्यावयास तयार नाहीं ! याउलट मोनोटाईप यंत्रावर लिपि बसवितांना तिच्या-मध्यें दृष्टीला न जाणवेल अशा बेतानेंच फरक केले असल्यामुळें मोनो-टाईपवरील जुळाई देवनागरी मुद्रणांत जास्त प्रमाणांत वापरली जाणें शक्य आहे. तीं आणखीहि अधिक प्रमाणांत वापरली गेली असती,पण यंत्राच्या अतिशय किंमतीमुळें सर्वसाधारण मुद्रकाच्या आवांक्याबाहेर ती तूर्त दिसत आहे. तथापि फारसा बदल न करतां लिपि मोनोटाईप यंत्रावर बसाविली गेली आहे आणि लिपिसुधारणेचें एक ध्येय साधलें आहे हें विसरण्याचें कारण नाहीं. मोनोटाईप यंत्रावर लिपि बसवितांना बरींच 'करण' म्हणजे लोंब असलेलीं अक्षरें वापरलीं आहेत आणि तीं मोडतात असें एक विधान लिपिसुधारकांकडून केलें जातें. छापतांना अक्षरें मोडतात त्याचें कारण केवळ 'करण' आहे म्हणूनच नव्हे तर टाईप पाडण्यासाठीं जें धातूचें मिश्रण वापरलें जातें तें योग्य प्रमाणांतलें वापरलें जात नाहीं आणि छपाईंत झिजलेलीं आणि टाइपांना जास्त मार देणारीं यंत्रें दडपून तशींच वापरलीं जातात हें आहे. 'करण' असलें तरी त्याला उंच स्पेसांकरवीं बरोबर आधार मिळतो; पण घातूला चिवटपणा आणणारें कथील आजिबात वापरलेंच नाहीं आणि ओळींची जुळाई ठाशीव झाली नाहीं तर तो 'करणां' चा दोष नाहीं, वापरणारांचा दोष आहे.

वस्तुतः लिपि यंत्रावर बसविण्याचा प्रश्न हा लिपितज्ज्ञांचा नव्हेच; तर तो यंत्रतज्ज्ञांचाच प्रश्न आहे. या बाबतींत जपानचें उदाहरण आपण विचारपूर्वक लक्षांत घेणें जरूर वाटतें. त्यांच्या टाइपांची संख्या कांहीं हजारांवर आहे पण म्हणून लिपीमध्यें त्यांनीं यत्किंचितहि फरक केला नाहीं. फरक केला तो लिपीच्या अनुरोधानें यंत्रामध्यें. लिपीनें मनावर केलेले संस्कार व दृष्टीचे संकेत बदलणें त्यांना अनिष्ट वाटतें. मग आपल्या परिपक्व लिपीबाबतहि तोच नियम लागू नाहीं का ? टाईप-जुळाऱ्याच्या एखाद्या तासाच्या बचतीकरतां हजारों वाचकांच्या दृष्टीवर सतत आघात करीत राहणें अनिष्ट नि अन्याय्य आहे. दचकविणारे फेरबदल करण्यानें वाचकांच्या डोळ्यावर अत्याचार होणार आहे. म्हणून कांहीं कारणानें लिपीमध्यें फेरबदल करणें अगत्यच असेल तर ते वेगळ्या मार्गानें घडवून आणणें जरूर असतें. प्रथम लोकांचें मत त्या सुधारणेसाठीं अनुकूल करून घेऊन, त्यांना ती वारंवार वापरून पटवून दिली गेली पाहिजे व जरूर ते फेरबदल लोकांच्या मनांत मुरल्यानंतरच ते सररहा वापरणें श्रेयस्कर असतें. केवळ छापण्याच्या सोयीसाठीं एकदम विशिष्ट सुधारणा आपण करणार आहोंत असें म्हणणें अयोग्य नि अप्रशस्त वाटतें. टंक वा छापण्याचा कलेची लिपि ही दासी नाहीं तर ती त्यांची राणी आहे. हा मुद्दा विचारांत घेऊनच लिपिसुधारणेचा प्रश्न हाताळणें जरूर आहे.

## देवनागरीची टंकसिद्धता

वस्तुतः आपली देवनागरी लिपि पुणें येथील श्री. शं. रा. दाते यांच्या परिश्रमामुळें मोनोटाईप यंत्रावर ज्याप्रमाणें बसविली गेली व तिचें दृश्य स्वरूप फारसें बदललें गेलें नाहीं त्याचप्रमाणें लिपि टाइपरायटरवर बसाविण्याचा प्रश्नहि दाते यांनीं फार सुंदर तऱ्हेनें सोडाविला आहे. नेहमींच्या देवनागरी टाईपरायटरमध्यें ड्रोळ्यांची जी आतिशय ओढाताण होते ती त्यांच्या प्रयोगांत होत नाहीं. त्याचप्रमाणें नेहमींच्या इंग्रजी टाईपरायटरवरच बटनांची संख्या यत्किंचितहि न वाढावितां त्यांनीं आपली लिपि टंक-सिद्ध केलेली आहे, आणि त्याचें विशेष हें कीं अगदीं जसें आपण लिहितों त्याच क्रमानें टंकलेखनहि करावयाचें. नेहमींच्या टाईपरायटरमध्यें हा क्रम साधला जात नाहीं. सारांश, लिपीचें वळण न बदलणें, दृष्टीला दचके न बसूं देतां वाचतां येणें,








जसें लिहितों तसेच टंक दाबणें आणि त्यांची संख्या इंग्रजी टाईपरायटरपेक्षां यत्किंचितहि न वाढवितां लिपि टंकसिद्ध होणें इतकें झाल्यावर आपणांस लिपींमध्यें फेरबदल करण्याची जरूरी ती कसली ? या बाबतींत संशोधनकार्य जें व्हावयाचें तें वस्तुतः संपूर्ण झालेलेंच आहे. जें कार्य आतां राहिलें तें फक्त प्रसाराचें. तेव्हा आजपर्यंत झालेल्या या संशोधनाचा सर्व जनतेला कसा फायदा मिळेल या गोष्टीवरच अधिक लक्ष केंद्रित व्हावयास हवें. लिपि-सुधारणासमितीनें सुद्धां ह्या व अशा प्रकारच्या व्यक्तिगत प्रयत्नांचा उपयोग राष्ट्रहिताच्या दृष्टीनें अधिक करून घेतला पाहिजे. अशा प्रकारच्या संशोधनाच्या कामांत त्यांतील अव्वलपणाकडे लक्ष जावें. त्यांत पक्षभेदातीत अशी भूमिका घ्यावयास हरकत नाहीं.

## वाचनसुलभतेचा वास्तव मार्ग

याप्रमाणें लिपिसुधारणेच्या प्रश्नाचें परिशीलन केल्यानंतर असें निश्चित अनुमान काढावयास हरकत नाहीं कीं देवनागरी लिपींत आज तडकाफडकीं कोणतीहि सुधारणा करण्याचें प्रयोजन नाहीं. येवढेंच नव्हे तर तशी कोणतीहि सुधारणा आपल्या समाजास आज झेपणार नाहीं. समितीपुढील उद्दिष्टांपैकीं लेखनाची सुकरता आणि मुद्रणाची सुकरता हे मुद्दे अत्यंत गौण आहेत असें ठरवून वाचनाची सुलभता हाच आजच्या काळांतील अत्यंत महत्त्वाचा प्रश्न आहे हें पाहिलें; पण वाचनाची सुलभता ही लिपींत फेरबदल करून साधली जाणार नाहीं तर ती साधण्याचा मार्ग अगदीं भिन्न आहे. तो म्हणजे लिपींत सुधारणा करण्याऐवजीं टाइपांच्या वळणांत सुधारणा घडवून आणणें ही होय. प्रगतिप्रियता ही अत्यंत आवश्यक आहे, पण ती लिपिऐवजीं मुद्रणासाठीं वापरल्या जाणाऱ्या टाइपांत दाखविणें जरूर आहे. तथापि "टाइपांतील सुधारणा" हा प्रश्न कदाचित् लिपिसुधारणासमितीच्या उद्दिष्टांच्या कक्षेबाहेरचा म्हटला जाणें शक्य आहे. पण समितीच्या नियुक्तेचा मूल हेतु साधण्याच्या दृष्टीनें त्याचीच अत्यंत जरूरी आहे. या दृष्टीनें टाइपाकरवीं मुद्रणांत वाचनसुलभता कशी आणतां येणें शक्य व आवश्यक आहे, याचेंच आपणांस जास्त परिशीलन करावयास हवें. संस्कृतीच्या जोपासनेचें आणि आधुनिक काळाच्या प्रगतिप्रवाहाबरोबर आपला मार्ग आक्रमण्याचें यायोगेंच साधलें जाणार आहे.

## सुवाच्यतेचीं गमकें

हिंदुस्थानांत जास्तींत जास्त लोकसंख्येला मान्य असलेली देवनागरी लिपि एकदां अंगिकारण्याचें ठरविल्यानंतर त्या लिपींत—म्हणजे तिच्या टाइपांत आणखी सुवाच्यता येण्यास कोणकोणते फेरबदल करणें आवश्यक आहे हें पाहिलें पाहिजे. वाचतांना लिपीशीं चांगला परिचय झालेली सर्वसामान्य व्यक्ति मुलाप्रमाणें अक्षरन् अक्षर वाचीत न बसतां सबंध शब्दाच्या आकारावरून उत्पन्न होणाऱ्या जाणीवे-( word conception ) अनुसार वाचीत असते हें सर्वमान्य सत्य आहे. ज्या वेळीं हीं अक्षरें शब्दाशब्दांगाणिक चांगलीं गुंफिलीं गेलीं असतात त्यावेळीं शब्दांची जाणीव लवकर नि अधिक सुकर होते. देवनागरींतील शब्दांची गुंफण केवळ शिरोरेखाच करीत असल्यामुळें तीं त्याज्य ठरविणें अनिष्ट होय.

देवनागरी लिपि व आपल्या इतर अन्य लिप्या ज्यावेळीं प्रथम उपयोगांत येऊं लागल्या त्यावेळीं त्या लेखनाधिष्ठित होत्या आणि आपले पहिले टाइप जे बनविले गेले ते जुन्या लेखनानुसार कसे येतील याचाच प्रामुख्यानें विचार केला होता. वळणांतील सौंदर्यहि कांहीं थोड्या टाइपांत आणण्याचा प्रयत्न केला होता; पण एका गोष्टिकडे मात्र त्यावेळीं दुर्लक्षच झालें; ती म्हणजे अक्षरांच्या जाड-बारीक विभागांमध्यें महदंतर नसावें ही होय. आपल्या बऱ्याचशा, विशेषतः बहुतेक मोठ्या टाइपांमध्यें हा विरोधाभास अत्यंत आहे; आणि सुवाच्यतेच्या दृष्टीनें तो त्याज्य आहे. लेखनांत लेखणीच्या अनुरोधानें अक्षराचे कांहीं भाग भरपूर जाड तर कांहीं विभाग अत्यंत बारीक येत असतील; परंतु याची पुनरावृत्ति मुद्रणांत व्हावयासच पाहिजे असें नाहीं. तसें करणें मुद्रणाच्या हेतूशींच विसंगत आहे. आपण लहान मुलासांठीं म्हणून मोठमोठ्या टाइपांत पुस्तकें छापतों व आतां तीं रंगींत व सचित्रहि पुरवूं

लागलों आहोंत. परंतु पांढऱ्या शुभ्र कागदावरील अत्यंत जाड बोजड रेषा व आतिशय बारीक रेषा यांचें मिश्रण मुलांच्या डोळ्यांवर खरोखरच आघात करतें हें आपण विसरतों; किंवा टाईपच नाहींत तर काय करावयाचें अशी समजूत घालून स्वस्थ राहतों. या दृष्टीनें आपल्या टाइपांची पुनर्घटनाच करणें प्राप्त आहे, नव्हे ती राष्ट्रीय जरूरीच झाली आहे. १८३१ ते १९४० पर्यंतच्या प्रदीर्घ काळांतील एकमेव सांच्यांत पाडलेल्या आमच्या देवनागरी टाइपांचा आम्हांस आतां वीट आला आहे असें म्हणावयास हरकत नाहीं.

इंग्रजीमधील ' बोदोनी' हें टाइपांचें वळण मुद्रणधंद्यांतील बहुतेकांच्या परिचयाचें असून त्या वळणांत टाइपाच्या जाडबारीक विभागांत अतिशय तफावत आहे. तीच गोष्ट आपल्या मोठमोठाल्या टाइपांबाबतहि आहे. बोदोनी वळणाचे बाबतींत इंग्लंमधील लेग्रॉस आणि ग्रँट या लेखकद्वयानें आपल्या ग्रंथांत उद्धृत करून ठेवलेले विचार या ठिकाणीं अत्यंत मार्मिक नि महत्त्वाचे वाटतातः

" BODONI FACE is an example of over-development resulting from a slavish attention to the technicalities of an art rather than to the object for which that art was originated. In consequence of its weakness and want of legibility, it is now being replaced owing to a more healthy taste, which is leading the reader back to insist on legibility, rather than on uniformity of tint, delicacy of appearance and beauty of workmanship— an apparently happy combination, which, however, was unfortunately not productive of durable and desirable results. "

वरील 'सुंदर व रेखीव' म्हणून समजल्या जाणाऱ्या टाइपावरील टीकेवरून आपल्या टाईपांतील विरोधाभास घालविणें किती अगत्याचें आहे हें लक्षांत येईल. अखेर सुवाच्यतेची निकड ध्यानांत घेऊन मूळ बोदोनी वळणांतहि पुढें फेरबदल करून घ्यावा लागलाच. तें वळण आज " BODONI BOOK FACE " म्हणून प्रसिद्ध आहे. त्यांत डोळ्यावर विलक्षण ताण पाडणारा जाड–बारीक विभागांतील फरक पुष्कळच कमी केला आहे. आपणहि त्या दृष्टीनें जरूर तो फरक करावयास नको का?

अक्षरांच्या सुवाच्यतेचें तिसरें गमक म्हणजे तीं फार चिवळ नसावींत. अक्षरें पूर्णपणें मोकळीं असलीं म्हणजे तीं वाचनास अधिकाधिक सुलभ होतात. इंग्रजीमधील old style आणि लायनोटाईपवरील सुवाच्यताश्रेणीमधील अनेक टाईप या दृष्टीनें जास्तींत जास्त सुवाच्य आहेत. देवनागरीमधील ' बुटका वन्निक ' या जुन्या टाइपाचें वळण त्या दृष्टीनें बरेंच सुलभ आहे. त्यांत जाडबारीक विभागांतील फरकहि फारसा जाणवणारा नाहीं त्यामुळें तें वळण आणि इतर बारीक टाइपांचीं कांहीं वळणें सुवाच्यतेच्या सांच्यांत बसूं शकतात. पण बहुतेक जाड आणि शीर्षकांच्या टाइपांचीं वळणें अवाच्य आहेत. कांहीं वळणें तर पाहवत नाहींत इतकीं बेढब आहेत. एखाद्या टाईप फौंड्रीचा ' टू लाईन ग्रेट ' याची निश्चित साक्ष देईल. या दृष्टीनें देवनागरींतील बऱ्याचशा बेढब वळणांचें उच्चाटन व्हावयास हवें. पण त्यांची जागा सुवाच्य व सुंदर वळणें घेणार कधीं वा केव्हां हाच प्रश्न आहे आणि तो सोडविला जाणें ही आज आत्यंतिक राष्ट्रीय जरूरी आहे.

## नागरी मुद्रणाचें चैतन्य

बोरू वा लेखण्या यांनीं लिखाण होत असतांना आपले टाईप लेखणीबरहुकूम ठेवण्यांत एके काळीं औचित्य होतें; पण आज ती परंपरा पूर्णतः पालटलेली आहे. आपण आज लेखण्या टाकून दिल्या असून फौंटनपेनें वापरूं लागलों आहोंत. फौंटनच्या लिखाणांत सर्व अक्षर सारख्या जाडीचें येतें. तद्वतच आजचे टाईप हे सारख्या जाडीचे तयार केल्यास ते कालनिदर्शकहि ठरतील आणि त्याचबरोबर वाचनाच्या दृष्टीनें जास्तींत जास्त सुवाच्यहि होतील. इंग्रजीमधील ' Sans serif '





अनुक्रमणिका

आणि ' Slab serif ' हीं वळणें आज अधिकाधिक मान्य होत आहेत याचें कारण हेंच. सारख्या जाडीचे टाईप हे केवळ सुवाच्यच आहेत असें नव्हे तर मुद्रणांतील आधुनिकतेचीं जीं अनेक गमकें आहेत त्यांच्याशींहि ते सुसंवादी ठरतात. असल्या व इतर अन्य वळणांच्या अनेक श्रेणी ( Series ) आजच्या मुद्रणालयांतून वापरल्या जाऊं लागल्या तर आधुनिक देवनागरी-मुद्रणाला एकदम कलाटणीच मिळेल. त्याचें स्वरूप एकदम पालटेल आणि जें मुद्रण एका दृष्टीनें अगदीं निर्जीव होत चाललें आहे त्यांत एकदम चैतन्य निर्माण होईल. लिपींत सुधारणा करूं इच्छिणाऱ्यांचा मूळ हेतु टाइपांचें पुनरुज्जीवन करण्यानेंच साधला जाणार आहे.

## नागरी टाइपांची पुनर्घटना

प्रस्तुत लेखकाच्या कल्पनेनें आणि प्रयत्नानें देवनागरीमधील सारख्या जाडीच्या वळणाचा पहिला टाईप १९४१ सालीं पुणें येथील लोकसंग्रह-कारखान्यातर्फे बाहेर पडला. या वळणाचें बाळसे-दार स्वरूप कित्येकांना आवडलें आणि देवनागरी अक्षरतज्ज्ञांना अशा वळणांचा भावी काल उज्ज्वल भासूं लागला. हें वळण आज कित्येक नियत-कालिकांत शीर्षकांसाठीं वापरलेंहि जात आहे.

या वळणांत आधुनिक विचारसरणीला मान्य होण्यासारखीं अनेक गमकें आहेत. आणि त्यांत कांहीं दोषहि राहिले आहेत हें नाकारण्यांत अर्थ नाहीं; तथापि हे दोष पुढील वाढींत दुरुस्त होऊं शकले असते; परंतु दुर्दैवानें या वळणाची जोपा-सनाच होऊं शकली नाहीं आणि तें ' जेवढेंचि तेवढेंच ' राहिलें. असल्या वळणांच्या सुधारून

> **नागरी लिपि आणि तिचें मुद्रण**
>
> असल्या प्रकारच्या जाड, बारीक आणि मध्यम वळणांच्या सुवाच्य टाइपांचा भावी काल अत्यंत उज्ज्वल आहे आणि हीच आजच्या आधुनिक वाचकवर्गाची आत्यंतिक मागणी आहे.

वाढविलेल्या अनेक श्रेणींना महाराष्ट्र-मुद्रणांत, किंबहुना हिंदी मुद्रणांत केवढें स्थान आहे हें पाश्चात्य वळणांच्या ऐतिहासिक घटनेवरून सहज उमगणारें आहे. अशा तऱ्हेच्या अनेक श्रेणींच्या ठाकठीक उपयोजनेनें हिंदी मुद्रणाचें मूल्यमापन निश्चित वाढेल, अखिल भारतीय मुद्रणांच्या स्वरूपांत विकास घडून येईल, देवनागरीलिपीला आधु-निकतेचा उजळा मिळेल, जाहिरातदारांच्या प्रयत्नांना देशी मुद्रणांत योग्य वाव राहील, व्यवहारकलाकारांना अल्पप्रयासानें देशी कलाकृति निर्माण करतां येईल, भारतीय संस्कृतीच्या श्रेष्ठत्वाला मुद्रणद्वारें दुजोरा मिळेल, मुद्रणाचें मूल ध्येय त्याद्वारें साधतां येऊन मांडणीचीं मूलतत्त्वेंहि परिणामपूर्वक साधलीं जातील. राष्ट्रधुरीणांचें लक्ष या हिंदी आधुनिकतेच्या आत्यंतिक मागणीकडे पोंचेल काय ? व्यक्तिगत प्रयत्नांची परिणति राष्ट्राचा दर्जा नि संस्कृति यांची जोपासना करण्यात उपयोजिली जाईल काय ? राष्ट्रनेत्यांनीं मनांत आणल्यास देवनागरीमुद्रणांत क्रांति--नव्हे उत्क्रांति-त्वरित घडवून आणणें ही फार दूरची गोष्ट वाटण्याचें कारण नाहीं.

---

## स्वतंत्र बुद्धीनेंच सत्यनिर्णय

' जोंपर्यंत आपण बाहेरच्या प्रमाणांनीं चालत आहों--एकजण मोझेस आणि खिस्त याला, दुसरा महंमदाला, व तिसरा समाजवादी मार्क्स याला प्रमाण मानीत आहे तोंपर्यंत आपलें परस्परांतलें वैर थांबणार नाहीं. '

**--टॉलस्टॉय,** आचार्य भागवत यांच्या ' जीवन आणि साहित्य 'मधून





अनुक्रमणिका

श्री. विभूतिभूषण मुखोपाध्याय : अनु. : श्री. चंद्रोदय भट्टाचार्य

# * " का व्य "

— १ —

जवळ जवळ महिनाभर कच्चें व करपलेलें अन्न खाल्ल्यानंतर, अर्धपोटीं व कांहीं दिवस तर अगदीं उपाशीं राहून मोठ्या कष्टानें एक आचारी मिळाला. आपल्या दोन्ही हातांकडे पहायला सवड झाली. डोळे फाटून पाणी वाहूं लागलें. या पोटाची गुलामी करतां करतां हात कापून भाजून हातांचें कांहींचें कांहींच झालें होतें; भाजी चिरणें, पेज गाळणें, डाळ कलसणें हें सर्व या दोन हातांतूनच तर गेलें !

तें कांहींहि असो. हा मनुष्य मिळाला हें चांगलेंच झालें. पहिली गोष्ट म्हणजे हा या प्रांताचा नव्हे. या प्रांतांत सहा एक महिने राहून मिळालेल्या अनुभवावरून येथला स्थानिक मनुष्य ठेवण्याची प्रवृत्ति नव्हती. जसा तो आळशी तसाच निकामी; आणि त्याचें घर जर जवळ असलें तर एका महिन्याचें सामान पंधरा दिवसांत खलास करून टाकील. नुसते तांदूळ व डाळीच नव्हेत तर तेल, मीठ, हळद, तेजपान कांहींच सोडणार नाहीं. सर्व दोष उंदरांवर टाकावयाचा. मी जर विचारलें, " अरे उंदराचा तेल, मीठ नि तेजपान यांच्याशीं काय संबंध ? " तर उत्तर मिळायचें कीं " तुम्ही पूर्वेकडचे आहांत; तुम्हांला इकडच्या उंदरांची कल्पना नाहीं ! "

दुसरी सोय मला अशी दिसली कीं हा नवीन आचारी वयस्क मनुष्य होता: पंचेचाळीस शेहेचाळीस त्याचें वय असेल. झोकनोकाचा फारसा त्रास नसावा; म्हणजे आमचा स्पंज, साबण, डोक्याचें तेल बरेंच सुरक्षित राहील असेंहि वाटलें. तिसऱ्यांदा जो आचारी ठेवला होता तो गेल्यानंतर असें कळलें कीं तो रात्री माझा रेशमी ' झब्बा ' व पम्प शू देखील आपल्या ताब्यांत ठेवावयाचा. परंतु हा मनुष्य साधासुधा होता. त्याची दाढी मिशा व डोकें यांची वस्तऱ्यानें चप्पी केली होती. आणि इकडे पुनः पाठ व छाती काळ्याकुट्ट कुरळ्या केसांनीं भरलेली. म्हणजे ज्या भागाच्या केसांचा शौकीनपणा करतां येईल त्याचें निर्मूलन केलेलें; उलट जो षोक करण्यास अयोग्य असा भाग जिवंत ठेवला होता.

आणखी एक गोष्ट अशी कीं या गृहस्थाचें घर छातन्याजवळ एका खेडेगांवीं होतें. छातना चंडीदासाचें गांव आहे, असें कित्येक लोकांचें आग्रहाचें म्हणणें आहे. खरें खोटें कांहींहि असो, तिकडच्या लोकांच्या मनावर त्या गोष्टीची कांहीं छाप असतेच.

---

* श्री. विभूतिभूषण मुखोपाध्याय हे बंगालमधील विद्यमान प्रथम श्रेणींतल्या कादंबरीकारांपैकीं एक प्रमुख असून, प्रसिद्ध लघुकथाकारही आहेत. चार विभागांत प्रसिद्ध झालेल्या ' राणूर कथा ' या कादंबरीनें ते पहिल्यांदा प्रसिद्धीस आले. त्यांच्या लेखनशैलीचा विशेष म्हणजे त्यांच्या कथाकादंबऱ्यांतून कारुण्य आणि विनोद यांचे सुकुमार सूर वहात असतांना प्रतीत होतात— प्रस्तुत ' काव्य ' ही लघुकथा त्यांच्या ' क्षण अन्तःपुरिका ' या लघुकथासंग्रहांतून घेतली आहे.—— या लघुकथेचा प्रस्तुत मराठी अनुवाद करतांना मला माझे तरुण मित्र प्रा. ग. ना. जोशी ( नवसारी येथील कॉलेजमधील तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक ) यांचें जें साहाय्य झालें त्याचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख करतों. ——अनुवादक





अनुक्रमणिका

कवीच्या प्रांताचा मनुष्य तो, त्याच्याबद्दल माझ्या मनांत थोडीशी श्रद्धा उत्पन्न झाली; माझ्या मनाला विश्वास वाटला कीं, हा भलत्याच वेळीं कांहीं दगा देणार नाहीं. मुळांत भावना तर एकच आहे, प्रियकरणीकडे गेली कीं तिला म्हणतात प्रणय आणि मालकाकडे गेली कीं तिला म्हणतात स्वामिनिष्ठा.

या सर्व गोष्टींव्यतिरिक्त एक वेळ अनुभव घेतला कीं तो स्वयंपाकहि फक्कड करतो.

—२—

पावसाळ्याचे दिवस. त्याच्या आधीं कित्येक दिवस भयंकर उकडत होतें. त्यांत पुनः स्वयंपाकाची भर. उकडणें, चुलींतल्या जाळाची आंच, त्याशिवाय जठराग्नीचा ताप. कसे दिवस काढले होते हें सांगून कळणें कठीण आहे. जाऊं द्या. आतां तर नशीब उघडलें. सकाळींच गोपीनाथ हातीं लागला. छान स्वयंपाक केला होता. रात्रीं तर आणखी छान, कारण कदाचित् सकाळीं सर्व गोष्टी बघायला नीट वेळ मिळाला असेल तेव्हां त्याला. निश्चितता व चांगलें पोटभर जेवण. उकडणें मुळींच जाणवलें नाहीं. दुसरा दिवस त्याच्यापेक्षांहि झक्क. सकाळीं उठून पाहतों तर सर्व आकाश काळ्या मेघांनीं भरून गेलें होतें. कोठें एवढीशी सुद्धां रिकामी जागा नव्हती. तरी पण विसांवा वाटत नव्हता. ढगाचे पातळ थर एकामागून एक मंदगतीनें एकसारखे पूर्वेकडून पश्चिमेकडे उडत चालले होते. पाऊस अजून सुरू झाला नव्हता. कदाचित् तयारी अपुरी असेल तर ती पुरी करून पाऊस भर जोरानें ओतावा याकरितांच जणूं काय मेघमंडळांत इतकी गडबड चालली असावी असें वाटत होतें. एवढा सुद्धां आवाज होत नव्हता. हळूहळूं सारें आकाश व्यापून रात्रभरांत एवढी तयारी झाली होती. रात्रीं आकाशभर पसरलेलीं नक्षत्रें पाहून निजायला गेलों होतों. सकाळीं डोळे उघडतांच एखादी जादूची कांडी फिरल्यासारखें वाटलें. होतों एका ठिकाणीं, पण रातोरात जणू काय कोणीतरी दुसरीकडे मला नेऊन फेंकलें होतें.

आमचें घर कांसाई नदीच्या अगदीं कांठावर होतें. आधीं नदी, तिच्यानंतर एक तट, त्याला लागूनच माझें घर होतें. मातीच्या भिंतींचेंच घर, तरी पण थोड्या नवीन धर्तीचें. घराच्या पुढें व मागच्या बाजूस त्यांतच दोन पडव्या होत्या. ही इकडची पद्धतच असावी. अलिकडे दिवस तर कोरडेच गेले; परंतु छोटानागपूरच्या टेंकड्यांमध्यें मात्र पाऊस सुरू झाला असला पाहिजे. भगव्या रंगाच्या वेगचंचल पाण्यानें कांसाई नदी उसळत होती. नदीच्या पलीकडच्या कांठापासून उसळणाऱ्या लाटांसारखी वर खालीं दिसणारी जमीन खालींवर खालींवर अशी कितीतरी लांबवर पसरली होती. अगदीं फार लांबच्या दक्षिण पश्चिमेकडच्या क्षितिजाला अगदीं खेटून जणुं काळ्या मेघाखालीं दाट नील रंगाची सर्पाकृति रेषा —म्हणजे मयूरभंजच्या टेकड्या होत्या.

फार दिवसांनंतर त्या दिवशीं माझें मन एक प्रकारच्या मनमोकळ्या निष्क्रियतेनें भरून गेलें होतें. माझ्या मनःस्थितीला धरूनच आमच्या सब-रजिस्ट्रारच्या ऑफिसला त्या दिवशीं सुटी मिळाली. एक आरामखुर्ची बाहेर आणून तिच्यावर मी हातपाय पसरून देऊन समोर चोहोंकडे नजर फिरविली... आदल्या दिवशींच गोपीनाथ मिळाला होता, तेव्हां मला मीच परत मिळालों असें वाटून गेलें. स्वयंपाकघराच्या एकसारख्या काळजीनें माझ्या खऱ्या आत्म्याला जणुं त्याच्या स्वतःच्या घराबाहेर हांकून दिलें होतें. आकाशांत जसजसे ढग जमा होऊं लागले तसतसा माझा आत्मा हळुहळूं आपल्या घरीं परत येऊं लागला. माझ्यांत एक प्रकारची उत्कट आकुलता जागी होऊं लागली, इतकेंच नव्हे तर खरोखरच कागद-पेन्सिल घेऊन बसावेसें वाटूं लागलें.

गोपीनाथ चहा घेऊन आला. माझी मनःस्थिति तेव्हा इतकी मृदु झाली होती कीं गोपीनाथाशीं देखील या दिगंत पसरलेल्या सौंदर्याविषयीं दोन शब्द बोलावेसें वाटलें. विशेषेंकरून अशा दिवसांत मित्रहीन अशा प्रांतांत जो कोणी आपल्याजवळ असेल त्याच्यापुढें आपलें मन उघडें करावेसें वाटतें. परंतु गोपिनाथाच्या तोंडाकडे पाहून मला त्याबद्दल कांहीं उत्साह वाटला नाहीं. त्याच्या चेहऱ्यावरील प्रत्येक रेषा कठोर होती. दृष्टींत भावनेचा लेशहि

नव्हता, डोक्याच्या शेंडीपासून तों हनुवटीपर्यंत सर्व चेहरा स्वयंपाकघरांतील धुरानें धुरकटला होता. नोकरी पत्करतांना तो जरा ऐटीनेंच म्हणाला होता—" सात पिढ्यांपासून आम्ही लोक स्वयंपाक करीत आहोंत, बाबूजी. या कामांत आम्ही कधींहि माघार घेणार नाहीं. "

तरी पण तो चंडीदासाच्या गांवचा असल्यामुळें मला त्याच्याशीं दोन काव्यमय शब्द बोलण्याचा मोह आवरतां आला नाहीं. मी म्हणालों, "आकाशांतील ढगांकडे पाहिलेंस का गोपिनाथ? तुला कसें काय वाटतें?" गोपीनाथ त्याची भावशून्य दृष्टि आकाशाकडे वळवून म्हणाला—" काय वाटतें? एक गोष्ट तर खरी...आज तर खिचडी ठेवतों बाबूजी, पाऊस खूप पडेल. "

यानंतर त्याच्याशीं जास्त बोलावेसें मला वाटलें नाहीं. परंतु गोपीनाथ माझ्या हृदयाची सतार पावसाच्या सुरांत अधिकच लावून गेला. जगांतील जेवढ्या म्हणून विरहिणी असतील त्या सर्वांकरितां माझें हृदय व्याकुळ होऊन उठलें. पावसाळा येतो आणि त्यानिमित्त निस्संग अन्तःपुरांत वेदना जागृत होते, परंतु त्या वेदनेला समवेदना कोठें जागृत होत नाहीं—हीच जीवनाची ' ट्रॅजेडी ' आहे असें मला वाटलें...

जगांतील सर्व पुरुष जणुं गोपीनाथच आहेत असें वाटून गेलें. ते इतके कार्यमग्न व नीरस असतात कीं त्यांचें मन अशा सुंदर वर्षादिवशींहि विरघळत नाहीं. पुरुषांच्या विरहवेदनांबद्दल जेवढें म्हणून काव्य झालें आहे ते सर्व निरर्थक व मिथ्या आहे असें मला वाटून गेलें. पुरुषांना विरहव्यथा म्हणून कांहीं खरा अनुभव येत नसतो. फार झालें तर कदाचित् कांहीं थोडावेळ दूरावल्याची जाणीव होत असेल, व तो अगदींच केवळ शरीरधर्म आहे...देशदेशांतरीं सर्व आकाश व्यापून राहिलेलें हें निबिड मेघांचें आवरण जणुं वेदनेचेंच आच्छादन आहे असें मला भासलें; आणि या आच्छादनाच्या कृष्णछायेंत सर्व अन्तःपुरांतील खिडक्याजवळ सर्व विरहिणींचे व्याकुळ नेत्र या आकाशासारखे निश्चल व ओलावलेले असे मला दिसत होते.

तरी पण ज्यांच्याकरितां ही इतकी व्याकुलता ते सर्व पुरुष मात्र अगदीं निर्विकार आहेत. त्यांच्या विसांवा नसलेल्या कठोर आयुष्यांत वर्षा-ऋतूंत जर एखादी कांहीं सुखस्मृति असलीं तर तीहि या खिचडीसारख्या पदार्थांची. त्यापेक्षां दुसरा विचार जणुं त्यांच्या आटोक्याबाहेरचाच असावा असें मला वाटलें.

मेघदूतांतील यक्षहि आषाढाच्या प्रथमदिवशीं प्रियेच्या हातच्या खिचडीचीच आठवण करीत असावा, आणि ही शरमेची गोष्ट दाबून ठेवण्याकरितांच महाकवीचें हें एवढें शब्दावडंबर असावें असें मनांत आल्याशिवाय राहिलें नाहीं.

दुपारच्या आधींच पाऊस सुरू झाला.

गोपिनाथानें खिचडीच केली होती. मजकडून कांहीं उत्तर न मिळाल्यामुळें स्वतःचें कौशल्य दाखविण्याकरतांच कदाचित् इतका काळजीपूर्वक स्वयंपाक त्यानें केला होता. फार समाधानाचें जेवण झालें; त्यानंतर मी ओटीवर येऊन बसलों.

येथील पावसाचा प्रकार अगदींच निराळा आहे. बंगाल्यांत आपल्याकडे फार गर्द झाडी असल्यामुळें इकडच्या सारखा पावसाचा देखावा उघडपणें व स्पष्ट दिसूं शकत नाहीं. पाऊस पदोपदीं अडविला जात असल्यानें त्याचें स्वरूप जरा विकृत होऊन जातें. वर्षाव तर खूप जोराचा असतो, त्यांत पुनः मंद वाऱ्यानें पावसाच्या धारा तिरप्या होऊन खालीं जमीनीला येऊन भिडतात. ह्यामुळें पावसाच्या धारा वरपासून तों थेट खालपर्यंत एकदम समग्र रीतीनें पहायला सांपडतात. पाण्याचे तुषार हळुहळू वाढत असल्यानें चारी बाजूस थोडेथोडें अंधुक होऊं लागलें व क्रमानें तें जास्त-जास्त अंधुक होत गेलें.

दूरच्या मयूरभंज टेकड्यांची नीलरेषा पुसली गेली, त्यानंतर आणखी जवळची उतरती चढती जमीन, आणि त्यानंतर कांसाई नदीच्या पलीकडच्या तीराची रेषा देखील पुसली गेली. त्यानंतर आणखी थोड्या वेळानें कांसाई नदीचें पाणी अधिक बेछूट होऊन उफाळू लागलें. त्यांतच एकाएकीं वारा देखील बेफाम झाला. उन्हाळ्यांत जसे मातीचे कण घेऊन तो वेड्यासारखा अस्ताव्यस्त फेंकतो तसाच

आतां पावसाच्या तुषारांशीं तो उन्मत्त होऊन खेळूं लागला. थोड्या वेळांतच कांसाई नदी दृष्टिपथांतून नाहींशीं झाली.

माझ्या मनांतून देखील सर्व विचार नाहींसे झाले. नुसता एकच विचार जागा राहिला, व तो म्हणजे हा तुफानी पाऊस आणि सर्व विरहिणींच्या अशांत हृदयांतील विरहवेदना. केव्हां मी कागद व टांक घेऊन लिहूं लागलों त्याचें मला मुळीं भानहि नव्हतें...सबंध दिवसभर एकसारखा पाऊस चालला होता.

–३–

जेव्हां अवेळीं संध्याकाळ झाली आणि तिच्या छायेनें चारी दिशा अंधुक झाल्या तेव्हां जोराच्या पावसानें ढुळ्या झालेल्या एका छत्रींतून भिजत भिजत ललितबाबू मजकडे येऊन पोहोंचले. माझ्या हातीं जणुं स्वर्ग आला !

ललितबाबू येथील शाळेंतील एक पदवीधर शिक्षक होते. पोलीस ठाणें, सबरजिस्ट्रार कचेरी व शाळा यांनीं वसविलेल्या या भागांत केवळ या एकट्याच गृहस्थाशीं माझी निकटची मैत्री झाली होती. नुसती मैत्री म्हटली म्हणजे सर्व कांहीं व्यक्त होत नाहीं, तर आम्ही एकमेकाशीं इतके निगडित झालों होतों कीं आम्ही एकमेकांच्या भरवंशावरच येथें टिकून राहिलों होतों असें म्हणतां येईल.

ललितबाबू कलेचे खरे रसिक व दर्दी होते. त्यांत पुनः ते माझे समवयस्क होते. मी जेव्हांची गोष्ट सांगत आहे तेव्हां त्यांचें देखील वय ३०–३५ च्या आंतच होतें. म्हणून आमच्या गप्पागोष्टी व चर्चा किंवा विचारांची देवघेव करतांना कोणत्याहि प्रकारच्या आडपडद्याची जरूरी वाटत नसे.

मी जरी आनंदानें पुलकित झालों होतों तरी जरा आश्चर्यचकित होऊन मी त्यांना विचारलें, "तुम्ही आजच अगदीं येथें येऊन ठेपलांत !"

हिंदु व मुसलमानांच्या कांहीं सणानिमित्त व आणखी एकदोन प्रसंगांनिमित्त त्यांच्या शाळेला एक आठवड्याची सुट्टी मिळाली होती. म्हणून ललितबाबू त्यांच्या घरीं गेले होते. तरी पण त्यांना सुट्टी संपण्याच्या आधींच परत आलेले पाहून मी असें विचारलें. थोडया दुःखानेंच जणुं काय थोडें हंसून ललितबाबू म्हणाले—" मास्तरांचें आयुष्य —शिकवणी तर आहे... "

एवढे पावसाळ्याचे सुंदर दिवस मोकळे सांपडले असतांना केवळ पोटाच्या रूक्ष उद्योगासाठीं सर्व सोडून परत यावें लागलें याबद्दल त्यांना वाटणारा खेद त्यांच्या या चार शब्दांत लपला होता. मी त्यांची थोडी थट्टा करूं पाहात होतों, पण त्यांच्या तोंडाकडे बघून माझ्या तोंडून तसला शब्द बाहेर पडूं शकला नाहीं. अर्थात् त्यानंतर तशा थोड्याशा विनोदी गोष्टी झाल्या; पण पहिल्या प्रथम त्यांच्याशीं झालेल्या बोलण्यांत दिसलेला खेदाचा सूर नंतरच्या दिवसभरच्या गप्पांत कायमचा होऊन राहिला होता. आणि असें होणें अगदीं स्वाभाविकच होतें. एक तर पावसाळ्यानें माझ्या मनांत हा सूर आधींच निर्माण केला होता. ललितबाबू देखील हाच सूर लावून घरून आले होते, अशा या सुराला मैफलींतून घालवणें कसें शक्य होतें ?

दुसऱ्या एका आरामखुर्चीवर ललितबाबू देखील आपलें शरीर मोकळेपणानें पसरून पडले. आम्हीं दोघेहि ज्या एका मनःस्थितींत होतों ती दाबून टाकण्यासाठीं अगदीं साध्या प्रश्नोत्तररूपानें आरंभीं थोडया गप्पागोष्टींचा प्रयत्न केला. त्यानंतर आमच्या मौनाचा काल अधिकाधिक वाढूं लागला; शेवटीं आमच्या दोघांचीं हृदयें जेव्हां कांसाई नदीसारखीं कांठोकांठ भरून गेलीं तेव्हां दोघेहि एकदम फार बोलके होऊन गेलों. त्याला दुसरेंहि थोडें कारण होतें.—अंधाराबरोबर आमच्या समोरून बाहेरचें जग नाहींसें झालें आणि नुसती वाऱ्याची सळसळ, पावसाची सडसड, बेडकांचें ओरडणें हीं सर्व मिळून एक विचित्र वृंदसंगीत शिल्लक राहिलें.

आमच्या ऑफिसचा शिपाईच घरच्या गड्याचें काम करीत असे. तो आमच्यासमोर दिवा ठेवून गेला. ललितबाबू म्हणाले, "नाहीं बुवा, अशी सुंदर रात्र साजरी केलीच पाहिजे बरं का शैलेनबाबू ! नाहीं तर सबंध जन्मभर खुमखुमी राहून जाईल; तुम्ही तुमच्या कवितांची वही काढा, मग त्या रवि-





अनुक्रमणिका

बाबूंच्या असोत कीं दुसऱ्या कोणाच्या. आणि तुमचें दिलरुबा वाद्यहि आणा."

आम्हांला काव्यानें अगदीं भारून टाकलें होतें. गोपीनाथाला हांक मारून मी सांगून टाकलें कीं आज ललितबाबू येथेंच जेवतील.

—४—

ही गोष्ट पावसाळ्याच्या गुणगायनाकरितां नसून हा काव्याच्या विडंबनाचा इतिहास होय. त्या आर्द्र वर्षारात्रीं काव्याच्या हातीं स्वतःला संपूर्णतः अर्पण करून केवढी घोडचूक केली होती तेवढेंच सांगून ही गोष्ट आतां पुरी करतों.

रवींद्रनाथांच्या कवितांचें गायन संपलें. कविवर्यांच्या वर्षा-कविता नेहमीं मजजवळ असतातच. ललितबाबूंचा गळा जसा संगीतांत तसाच काव्यगायनांत अति गोड होता.

पावसाळ्याच्या मंद्र-सप्तकाशीं सूर मिळवून ललितबाबू एकामागून एक अशा कविता म्हणूं लागले, आणि मी डोळे मिटून त्या दोन गतींत पूर्णपणें स्वतःला बुडवून घेतलें. रवींद्रनाथांच्या कवितांशिवाय इतरहि कांहीं कवींच्या निवडक कविता म्हटल्या गेल्या...बाहेर अंधाराचें रोमरोम ओलें करून एकसारख्या पडत असलेल्या पावसाबरोबर वाऱ्याचा आवाज अधिक चढला, सर्व विरहिणींच्या विरहाचे हाहाःकार एकत्र करून ते जणुं चोहोंकडे तो वायु पसरून देत होता. दुसऱ्या कवींच्या कवितांनंतर पुनः रवीन्द्रनाथांच्या कविता सुरू झाल्या.

आतांपर्यंत जेवढें झालें त्यानें कांहीं नुकसान झालें नाहीं. रवींद्रनाथांच्या कविता संपवून कांहीं वैष्णव कवींच्या कांहीं कविता आळवितांना ललितबाबूंच्या गायनांत कंठसंगीताच्या छटा उमटूं लागतात न लागतात तोंच गोपीनाथ येऊन म्हणाला—" वाढूं का बाबूजी ? "

आम्ही दिवे लागतांच घरांत येऊन बसलों होतों. गोपीनाथ पडवींत थोडा वेळ आमची वाट पाहात असावा. कदाचित् आमच्या बैठकींत येण्यानें आमच्या काव्यगायनांत कांहीं अडथळा आणायचा कीं नाहीं हें त्याला ठरवितां येत नव्हतें. परंतु वैष्णव कवींचीं गाणीं सुरू होऊन त्यांतून संगीताच्या आलापांच्या छटा उमटूं लागल्या तेव्हां जास्त उशीर होण्याच्या भीतीनें गोपीनाथानें आणखी जास्त वाट न पाहतां एकदम येऊन सूचना देण्याचेंच ठरविलें. अर्थात् हा माझा अंदाज होता. मी ललितबाबूंकडे पाहून म्हणालों : " तुमचें काय म्हणणं आहे ? वाढायचं का ? "

बराचसा विरस झाला. ललितबाबू माझ्याकडे पाहून थोडे हंसले. त्याच्या आधीं गोपीनाथानें या पावसाळ्याच्या सुंदर दिवशीं खिचडी चढविण्याची सूचना कशी केली होती ती ललितबाबूंना गमतीनें सांगितली होती; आतां त्यांच्या हंसण्यांत हें जणुं कांहीं स्पष्टपणें प्रतीत झालें कीं " तुम्हीं देखील अखेर गोपीनाथ बनलांत ! "

गोपीनाथाला मी म्हटलें : " आम्हांला अजून उशीर आहे. तूं फार तर सर्व कांहीं नीट झांकून ठेवून खुशाल झोंपून रहा. वेळेवर तुला आम्ही हांक मारूं. "

गोपीनाथानें विचारलें : " पावसाचें पाणी आंत येतें आहे म्हणून दार लावून घेऊं का ? "

मी म्हणालों—" बरं लावून घे. "

गोपीनाथ निघून गेल्यावर ललितबाबू म्हणाले : " आतां तुमचा दिलरुबा काढा. "

आतां ताना व आलाप यांत काव्यगायनाचें रूपान्तर झालें. ललितबाबू म्हणूं लागले—" ए भरा बादर, माह भादर, शून्य मंदिर मोर. " ( आतां भर पावसाळा आहे, महिनाहि भाद्रपद आहे; पण माझें मन्दिर मात्र सुनें आहे. )

हें जुन्या काळचें संगीत होतें, आणि कदाचित् तें वारंवार गायिलें गेल्यामुळें अधिक जुन्या काळचें म्हणून प्रतीत होत होतें. परंतु आतां मात्र अनेक युगें ओलांडून ज्या प्रथम दिवशीं कवीनें ही कविता स्वतः रचून स्वतःच्या कंठानेंच आपल्या हृदयाचे सर्व भाव त्यांत ओतून ती गाइली असेल त्या दिवसाला मी हें ऐकतांना जाऊन पोंचल्याचा मला भास झाला !

ललितबाबूंचा आवाज देखील इतका हृदयस्पर्शी पूर्वीं कधीं वाटला नाहीं. पाहतां पाहतां रात्रीच्या








सर्व विरहवेदनांनीं या गाण्याच्या कांहीं थोड्या शब्दांचें मूर्त रूप धारण केलें असें मला वाटून गेलें.

कदाचित् ह्यानें देखील कांहीं नुकसान झालें नसतें. ललितबाबूंनीं यानंतर भाटियाली सुरांतील एक गीत सुरू केलें. तें सुरूं करण्याच्या आधीं भावनातिशयानें त्यांनीं त्या गाण्याची थोडी पूर्व-पीठिका सांगितली. ते म्हणाले : " शैलेनबाबू, मला तर कांहीं वेळां वाटत असतें कीं भाटियाली संगीत हें सर्वश्रेष्ठ आहे; मग तें संगीत असो कीं काव्य असो ! ही जणुं कांहीं नदीच्या तीरावर आपोआप उगवलेली व वाढलेली रानवेल आहे; तुम्हांला काय वाटतें ? "

खरोखरच ललितबाबूंचें गायन मुक्त हृदयाच्या सर्व व्यथा घेऊन उघड्या मैदानाच्या भाषेंत, साध्या मातीच्या भाषेंत अगदीं सहज लीलेनें प्रकट झालें. हें संगीत अंधारानें आच्छादलेल्या चोहोंकडील मोकळ्या निसर्गाशीं, एवढेंच नव्हे आमच्या या घराशीं देखील, जणुं सुरानें व छंदानें एकतान होऊन गेलें. येथील प्राणाशीं जणुं अशा प्रकारें इतकें एकतान दुसऱ्या कोणासहि होतां आलें नसतें.

" अरे मित्रा, जेव्हां तूं कांहीं कामासाठीं होडींत बसून परतीराला गेलास, तेव्हां तिन्ही सांजांची वेळ होऊन गेली; मध्यें एक नदी होती तिनेंच मी वेडा झालों होतों. आतां तर आणखी एक नदी मध्यें येऊन ठेपली. म्हणजे हा पावसाळा. अरे मित्रा, आतां काय रे करूं ? कोठें बरं जाऊं ?... "

किती स्पष्ट व सहजरुदन ! याच्यापेक्षां जास्त स्पष्ट काय असूं शकेल ? हें आदिमानवाचें सहजरुदन आहे, त्याला भाषेच्या शृंगाराचा अजून कांहीं कृत्रिम वास लागला नाहीं. हें रुदन म्हणजे प्राचीन काळच्या त्या मूळच्या निराभरण वेदनांचे सूर होत. जें राजवाड्यापासून झोंपडीपर्यंत सर्वांच्या हृदयांत एकच प्रकारचें आहे व अनंत काळपर्यंत राहील, तें ओळखायला थोडा देखील वेळ लागत नाहीं.

पावसाच्या सुरांत घोळत घोळत ललितबाबू दिवसभरांत त्यांच्या हृदयांत सांठलेल्या सर्व भावना ओतून गात होते. रात्रीं बारा वाजतां ते थांबले.

गोपीनाथाला उठवायला फार त्रास झाला नाहीं. जोरानें एकदोन हांका मारतांच तो दार उघडून चोळत चोळत येऊन हजर झाला. त्याचे डोळे डोळे लाल झाले होते. ताटें वाढायला तो खालीं गेला तेव्हां ललितबाबू म्हणाले : " त्या बिचाऱ्यावर खरंच थोडा अत्याचार झाला आहे; झोंपला होता. बिचारा आजच इतक्या लांब पायीं चालून आला होता ! "

जेवतांना ललितबाबूंनीं गोपीनाथाच्या स्वयं-पाकाची खूप वाखाणणी केली. ते म्हणाले : " हा मनुष्य जरी उशीरा मिळाला तरी फार चांगला मनुष्य मिळाला तुम्हांला. बरं कां शैलेनबाबू, ह्याला कधीं सोडूं नका. "

मी म्हणालों : " सोडण्याचा काय प्रश्न ? किती छान खिचडी करतो ! उद्यां सकाळीं देखील तुम्ही येथेंच जेवा. उद्यां देखील पाऊस थांबणार नाहीं असा रंग दिसतो. म्हणजे खिचडी खाण्याचाच दिवस राहील तो. "

— ५ —

सकाळीं, जवळ जवळ पहांटेच डोक्यावर छत्री घेऊन ललितबाबूंच्या घरीं मला जावें लागलें. ललितबाबूंनीं आश्चर्यचकित होऊन विचारिलें— " या पावसांत एवढ्या अडचणींत एकदम तुम्ही आलांतसे ? म्हणजे मला आमंत्रण दिल्याची आठ-वण करून द्यायला आलांत कीं काय ? परंतु मी ब्राह्मण आहे ही गोष्ट तुम्ही विसरलां असें दिसतें."

मी म्हणालों : " नाहीं, आमंत्रण घ्यायला आलों! कारण तिकडे आमचेकडे आज शुकशुकाट आहे."

ललितबाबूंनीं अतिशय विस्मयानें विचारलें— "म्हणजे ? " मी म्हणालों— " गोपीनाथ फरारी झाला. काल आपण काव्याचा आनंद लुटत होतों, आणि तो गृहस्थ पडवींत बसून त्याच्या बायकोची आठवण करीत ओक्साबोक्शीं रडत होता. अगदीं वाङ्मयीन कवितांनीं तितकें कांहीं नुकसान झालें नाहीं, परंतु तुमच्या त्या भाटियाली सुराच्या गायनानें मात्र कांहीं परिणाम केला...सकाळच्या वेळीं त्याचा तपास केला तेव्हां आमच्या ऑफिसच्या शिपायानें हा सर्व प्रकार घडल्याचें सांगितलें. तो





अनुक्रमणिका

आणखी असें म्हणाला कीं गोपीनाथ एकसारखा डोळे पुसत होता आणि घरीं जाण्यासाठीं त्याचें मन अगदीं हुरहुरलें होतें......तो अगदीं पळूनच जाईल ह्याचा अंदाज मात्र शिपायाला नव्हता. पुनः असें म्हणतात कीं त्याची ही दुसरी बायको आहे......."

ललितबाबू पुनः विस्मयानें म्हणाले "तर मग तुम्ही असें कां म्हणत होतां कीं तो अगदीं अरसिक व रूक्ष प्रकृतीचा आहे ?" मी दुःखानें पण हंसत म्हणालों—"परंतु त्याला टोंचूनच त्याची रसिकता आपण जागी केली व आपणांवर हें संकट ओढून घेतलें, असें नाहीं का ? नाहींतर या गृहस्थाच्या सात पिढ्यांतहि विरह कशाशीं खातात हें माहीत नाहीं. आणखी त्या भाटियाली सुरानें मात्र अगदीं कहर केला. तुमचा गडी देखील नाहीं ना पळून गेला ? तुम्ही घरीं परत येऊन पुनः गायिलां होतां का ?"

ललितबाबू म्हणाले—"आमचा गडी तर अगदीं म्हातारा आहे !"

मी म्हटलें—"तरी पण गातांना किंवा ताना मारतांना थाडेसें सांभाळूनच गात जा. निदान पावसाचे एवढे दिवस तरी सांभाळा; कारण केव्हां काय घडेल कोण जाणे; हा प्रान्त जरा विचित्रच वाटतो."

---

## 'नया कश्मीर'

'**मौज**'च्या **दिवाळी अंकांत** ना. **न. वि. गाडगीळ** यांचा कश्मीरसंबंधीं एक लेख आला आहे. आपणांस झालेल्या कश्मीरदर्शनाचें श्री. गाडगीळ यांनीं जें मोठें नाट्यपूर्ण वर्णन केलें आहे, त्यामधून कश्मीरच्या आजच्या लोकस्थितीची उद्बोधक कल्पना येऊं शकते : "प्रदेश एवढा सुंदर व समृद्ध असून इतकें दैन्य व दारिद्र्य इतरत्र सांपडणार नाहीं. कश्मीर खोऱ्यांतील ९६ टक्के जनता मुसलमान आहे व धर्मवेडीहि आहे; इतकी कीं हिंदूंच्या हातचें जेवणसुद्धां मुसलमानी जनता स्वीकारीत नाहीं. भावनेच्या भरांत ती पाकिस्तानला सहानुभूति दाखवील याची जाणीव दीर्घदृष्टि कश्मीर-नेत्यांना आहे...... इस्लामी धर्माबद्दल बहुसंख्याक जनतेला अभिमान असला तरी पाकिस्तानी इस्लामियांची संस्कृति त्यांनीं अनुभविली होती ! खून, कत्तल व लूटमार यायोगें आपलें कश्मीरवरील प्रेम त्या लुटारूंनीं जगजाहीर केलें होतें ! या सर्व घटनेमुळें हिंदुस्थानबद्दल प्रेमापेक्षां पाकिस्तानच्या तिरस्कारावर आज तेथील मुसलमानांच्या मनाची घडण घडून आली आहे. तथापि ह्या अभावात्मक दृष्टिकोनाला आर्थिक कार्यक्रमानें स्थायी स्वरूप देण्याचे प्रयत्न चालविले आहेत....... आज जमिनदार हे अहिंसात्मक लुटारू समजुन त्यांना तत्सम शस्त्रांनीं कश्मीरच्या आर्थिक क्षेत्रांतून पिटाळून लावण्यांत आलें आहे. शेतांच्या उत्पन्नापैकीं ¾ भाग कसणाराचा ठरविण्यांत आला आहे ...... सरकारचें प्रचारतंत्र अभिनव आहे. त्यावर साम्यवादी तंत्राची छाया पडली आहे. साध्या मुलांच्या खेळांतूनसुद्धां वर्गयुद्ध प्रतिबिंबित केलें जातें. रस्सीखेंचीच्या खेळांत एका बाजुला राजे-नबाब, व्यापारी-दलाल वगैरे 'आहेरे', त्यांचें नेतृत्व मौलाना व पंडित यांचेकडे, दुसऱ्या बाजूस टांगेवाले, शेतकरी, कामगार, नावाडी, त्यांचें नेतृत्व निवर्गी विद्यार्थ्यांना देऊन रस्सीखेंचीचा खेळ दाखविण्यांत आला होता. शिक्षणांत, उद्योगांत सर्वत्र हें वातावरण उत्पन्न केलें जात आहे. ही 'नया कश्मीर'ची हवा आहे."













अनुक्रमणिका

प्रा. द. गं. कोपरकर

# बुद्धिबळांच्या खेळांतील कांहीं शब्द

अशी एक दंतकथा आहे कीं प्रभु रामचन्द्राच्या सैन्यानें लंकेस वेढा दिला असतां गांगरून गेलेल्या रावणाचें मनरंजन करण्याकरितां मंदोदरीनें बुद्धिबळांचा खेळ शोधून काढला.[१] याच दंतकथेचें विकृत स्वरूप म्हणजे कॅक्स्टन या इंग्रजी मुद्रकानें केलेला पुढील उल्लेख होय :

This play was found in the time of the vataylles and the siege of Troye.[२] इ. स. च्या दहाव्या शतकांत फिरदौसीनें आपल्या शहानाम्यांत बुद्धिबळांच्या शोधासंबंधीं एक निराळीच दंतकथा सविस्तर दिली आहे.

हे पारम्परिक उल्लेख सोडले तरी बुद्धिबळांचा शोध फार प्राचीन असावा हें दाखवण्यास सबळ पुरावे आहेत. "प्राचीन इजिप्तमधील लोकांत सोंगट्या-बुदबळांसारखे खेळ असत. राणी हतसूचा खेळण्याचा पट संशोधिला गेला आहे." (ज्ञानकोश).

परंतु या खेळाचें स्वरूप स्पष्ट होत नाहीं व आपल्या बुद्धिबळांशीं त्याचा संबंध नसावा असें वाटतें. हिंदु लोकांनीं वेदकाळीं हा खेळ शोधून काढला असें मानण्यास बरीच जागा आहे. "ख्रिस्तपूर्व ११२० त चिनी लोक बुद्धिबळें खेळूं लागले. पण ते आपण होऊनच असें सांगतात कीं, त्यांच्याही आधीं एक हजार वर्षें हा खेळ हिंदु लोकांना माहीत होता." (प्रा. माटे : विज्ञानबोधाची प्रस्तावना, पान १३). चन्द्रगुप्त-मौर्यांचा समकालीन (खि. पू. ३२२–२९८) जैन साधु थेरभद्रबाहु यानें लिहिलेल्या 'सूत्रकृतांग'-नामक ग्रंथांत 'अष्टापद' खेळाचा उल्लेख आहे. लहान लहान चौरस आंखलेल्या (chequered) फलकावर हा खेळ खेळतात असें टीकाकारांच्या मतें आहे.[३] यावरून हा बुद्धिबळांचाच खेळ असावा असें अनुमान निघतें. याच खेळाचा उल्लेख हरिवंशांत व रामायणांत येतो. इ. स. च्या सातव्या शतकांत बाणानें या खेळाचें वर्णन आपल्या कादंबरींत केलें आहे. नवव्या शतकाच्या पूर्वार्धांत रत्नाकरानें आपल्या हरिविजय नांवाच्या महाकाव्यांत (१२·९) बुद्धिबळांचा निर्देश केला आहे. अबुल आबास (९ वें शतक) व फिरदौसी यांनीं तर बुद्धिबळांची पुष्कळ माहिती व नियमही दिले आहेत. तसेंच भविष्यपुराणांतही या खेळाचे

---

१ Sir William Jones, Asiatic Researches, II. 159

२ Caxton, Game of Chesse, Fascimile, 1862

३ अष्टापद हा शब्द सुवर्ण या अर्थानें पुं-नपुंसक असतो व इतर अर्थीं फक्त पुल्लिंगी असतो असें लिंगानुशासनकारांचें म्हणणें आहे. हर्षवर्धनाच्या लिंगानुशासनावरील टीकेंत "अष्टापदं चतुरंगफलकं" असा अर्थ दिला आहे. वर्धमानाच्या 'गणरत्नमहोदधी' मध्यें "अष्टौ पदानि अत्र इति अष्टापदं, शारिफलं" असें स्पष्टिकरण आढळतें तर हेमचंद्र आपल्या लिंगानुशासनवृत्तींत "अष्टापदं सुवर्णं **द्यूतफलकं** च॥ अर्थप्राधान्यात् शारिफलकमपि।" असें विवरण करतो.





अनुक्रमणिका

नियम आढळतात. इ. स. च्या १० व्या शतकानंतर हिंदुस्थानांत आणि इतरत्र हा खेळ फारच लोकप्रिय झाला, या गोष्टीस जास्त पुरावा देण्याची आवश्यकता नाहीं. अकबर बादशहानें आपले हत्ती, घोडे व शिपाई घेऊन हा खेळ मोठ्या मैदानावर खेळून पाहिला होता.

## बुद्धिबळांचें परदेशागमन

चिनी लोकांना पुरातन काळीं बुद्धिबळें शिकवणारे लोक हिंदू होते या संबंधीं वर एक उतारा आलाच आहे. इ. स.च्या सहाव्या शतकांत १ ला खुश्रू ( Chosroes )अनुशिर्वान् ( Anushiravan ) याचा बोझूं नामक वैद्य कान्यकुब्ज ( कनौज ) नगरांत बुद्धिबळें शिकला व त्यानेंच हा खेळ प्रथम इराणांत पसराविला. सातव्या शतकामध्यें अरब लोकांनीं इराण जिंकला तेव्हां त्यांना या खेळाची माहिती झाली. नंतर अरबांनीं स्पेन पादाक्रांत केला तेव्हां हा खेळ स्पेनपर्यंत पोहोचला,व तेथून यूरोपांतील इतर देशांत प्रसृत झाला. नॉर्मन राजा विल्यम् यानें १०६६ मध्यें इंग्लंड जिंकलें तत्पूर्वीच बुद्धिबळांचें लोण इंग्लंडमध्यें पोहोंचलें होतें.

## चतुरंग

बुद्धिबळाच्या खेळास संस्कृतांत चतुरंग म्हणतात. कारण हा खेळ म्हणजे दोन राजांच्या चतुरंग सेनेचें छुटपुटींचें युद्धच होय. तिथ्यादित्य या ग्रंथांत ' चतुरंग ' चौघांनीं खेळावयाचा असें सांगितलें आहे. फारशी भाषेंत चतुरंगाचा प्रतिशब्द चत्रंग असा बनला. उदाहरणार्थ, जुन्या पेहेलवी भाषेंत " मेदिगान्-इ-चत्रंग " नांवाचें पुस्तक उपलब्ध आहे. अरबी भाषेंत च व ग हे उच्चार नसल्यामुळे चत्रंगऐवजीं **' शत्रंज '** म्हणावें लागे. या शब्दापासूनच मराठींत सत्रंजी आली. अरबांच्या द्वारा देवांच्या संस्कृत भाषेंतील सर्व " चतुरंग " शब्द हिंडत हिंडत सर्व यूरोपांत पसरला व जसजसा तो लांब गेला तसतसा त्याचा तोंडवळा इतका बदलला कीं त्याचा मूळ शब्दांशीं कांहीं संबंध असेल असें वाटणारही नाहीं. Axedraz, (L) Scacchi, (OF) Esches, (F) échecs, (ME) Ches, Chesse, Chess, अशा अवस्थांतून चतुरंगाची उत्क्रांति Chess पर्यंत पोहोंचते, व या खेळाचें जन्मस्थान हिंदुस्थानदेशच होतो हें सिद्ध होतें.

' चतुरंग ' खेळावयास जी घडवंची घेत तिलाही तेंच नांव पडलें व ' चउरंग, चौरंग ' हे शब्द मराठींत आले. चतुरंग म्हणजे चार बाजू. म्हणून चार संघांतील चेंडूफळीच्या स्पर्धेस ' चौरंगी ' सामने म्हणूं लागले. आतां पांच संघांत चढाओढ होते म्हणून ' पंचरंगी ' सामने असा प्रयोग प्रचारांत आला आहे. व्याकरणदृष्ट्या ' पंचरंगी ' ऐवजीं ' पंचांगी ' असें रूप हवें. परंतु ' पंचांग ' शब्दाचा रूढार्थ अगदीं भिन्न असल्यामुळें ही सुधारणा कोणास मानवणार नाहीं.

## प्रामादिक व्युत्पत्ति

चतुरंगाचें अरबी शत्रंज असें स्वरूप सर्वत्र इतकें प्रचलित झालें कीं मूळ संस्कृत शब्द विसरून जाऊन शत्रंज शब्दाची चुकीची व्युत्पत्ति रूढ झाली. ती म्हणजे " शहा ( राजा ) + रंज ( संकट ) ": " राजावरील संकट " हा अर्थ या खेळाला अगदीं यथार्थतेनें लागू पडतो. कारण राजाला कोणतीच हालचाल करतां येणार नाहीं अशा तऱ्हेनें त्यास पेंचांत आणणें हें तर या खेळाचें उद्दिष्ट असतें. ही व्युत्पत्ति सर्वत्र रूढ झाल्यामुळें Chess शब्द Shah या फारशी शब्दापासून आला असें प्रामादिक विधान इंग्रजी कोशांतून आढळलें तर नवल नाहीं !

बुद्धिबळांतील राजा व वरील व्युत्पत्तींतील शहा यांचा एकच अर्थ असल्यामुळें या खेळांतील सर्व भाषामधील कितीतरी शब्द ' शहा ' शब्दाशीं संबद्ध आहेत तें पहाणें मनोरंजक होईल. शह ( सोंगटीनें राजाची केलेली कोंडी ), काटशह, नाशह, शह-शह हे फारशी शब्द ' शहा ' शब्दापासून आले हें उघडच आहे. पण पुढील इंग्रजी शब्दांचेही 'शहा'शींच जवळचें वा दूरचें नातें पोहचतें:–

( १ ) check, cheque हे शब्द इंग्रजींत पुढील पायऱ्यांनीं आले: shah, ( L ) scaccus ( Med. L ) scachus, ( F ) eschac, (F) eschec, (F) échec, eschek, (ME) chek.

(२) checker, chequer, exchequer या शब्दांच्या जुन्या अवस्था अशा : shah+(L) arium (chess-board), (Med. L) scacc–arium, (OF) eschequier, (OF) eschecquer, (ME) escheker.

एकाआड एक चौरस दोन भिन्न रंगांनीं ज्यावर रंगवले आहेत असा बुद्धिबळांचा पट असतो व म्हणून तशाच कापडास "चेकर्ड क्लॉथ" म्हणतात. राजकीय कोशाला 'एक्स-चेकर' म्हणतात; कारण तेथील हिशेबनीस आपल्या टेबलावर हिशेबाचें सोयीसाठीं चौकटींचे कापड पसरतात.

(३) Checkmate म्हणजे राजाला इतका अडचणींत टाकणें कीं त्याला कांहींच हालचाल करतां येऊं नये, राजाचा संपूर्ण पराजय, मृत्यु. हा शब्द संपूर्णपणें फारशी आहे. shāh māt (the king is dead), (F) échec et mat, (ME) chec mat (e). राजाचा पराजय करण्यास "चातुर्य वा करामत" लागते म्हणून **शहामत** किंवा **शामत** शब्दांचा तो अर्थ आजही होतो.

(४) Rook हा शब्द चतुरंगसेनेपैकीं रथापासून फार्शी 'रूख; रोख' द्वारां इंग्रजींत आला.

(५) Pawn हा शब्द चतुरंगसेनेपैकीं पत्ति, पदाति यापासून फार्शी 'पियादा, प्यादा, प्यादें'-द्वारां इंग्रजींत आला.

## षाही, षाहानुषाही

शहा शब्दापासून बुद्धिबळांतील शब्दाप्रमाणें इतरही पुष्कळ शब्द निरनिराळ्या भाषांत आले हें दाखविण्यासाठीं आणखी दोन उदाहरणें लक्षांत येतात. अलाहाबाद येथील समुद्रगुप्ताच्या स्तंभप्रशस्तीमध्यें 'षाही' असा जो शब्द येतो तो शहापासूनच आहे. षाही म्हणजे सामन्त, मांडलिक व राजा या क्रमानें वाढणाऱ्या तीन पायऱ्यांच्या वरच्या दर्जाची पदवी, "महाराज". वरील स्तंभप्रशस्तीमध्यें षाही शब्दानें पंजाब व काबूलवर राज्य करणाऱ्या कोणत्या तरी कुशान राजाचा उल्लेख केलेला आहे. हल्लीं मराठींमध्यें 'शाही विमानदल' हा शब्दप्रयोग 'रॉयल एअर फोर्स' या अर्थी रूढ झाला आहेच.

त्याच प्रशस्तींतील **षाहानुषाही** म्हणजे 'राजराज,' 'महाराजाधिराज,' 'राजांचा राजा' ही पदवी सुद्धां कुशानांचीच असावी. याच अर्थाच्या पदवी इतर भाषांतील पदव्या शिलालेखांत व नाण्यांवर आढळतात : हिंदी बॅक्ट्रियन राजाची Basileos Basileon,[४] डरायसच्या शिलालेखांतील क्षायथियानां क्षायाथिय, कनिष्काची शाओननो शाओ, पार्थियन राजा दुसरा मिथ्राडेटस् (खि. पू. १२३–८८) याची शाहान् शाहा, हिंदुधर्म स्वीकारणाऱ्या काबूल-व-सरहद्दीवरील तुर्की शाहियां वंशाची शाहि-न-शाही, पंजाबांतील शकांची साहाणुसाही व पै. जिन्हांची शहेनशहा.

कोणत्याही लहानमोठ्या बाबतींत निर्णय देण्यास सार्वभौम राजा सर्वाधिकारी असतो. म्हणून **शहानिशा** या शब्दाचा 'सोक्षमोक्ष' 'भवति न भवति' असा हल्लीं अर्थ होतो.

---

४ Basileus या ग्रीक शब्दापासून चंद्रगुप्त मौर्यांची वृषल ही संस्कृत पदवी चाणक्यानें तयार केली असावी व 'मुद्राराक्षस' नाटकांत या अभिधानानें राजाला हांक मारण्यांत चाणक्य राजाचा बहुमानच करीत असावा. तेथें वृषल या शब्दाचा जुना संस्कृत अर्थ घ्यावयाचा नाहीं.






# बदल

अटळ असे हा बदल नवा।
नव्या जगताची
चाहूल नवी
बेगुमानपणें दौडत आली;
कुजके संकेत पथीं तुडवित
चालली पुढें!
नाहीं उसंत नाहीं मनीषाहि
बघण्याला मागें
बेगडी दौलत
आतां मोडलेली!

उरीं बाळगलीं जोजविलीं जीं,
आजवरीचीं जीवनमूल्यें
(लाडकीं वांझ!)
सहज लीलेनें तयांची पारख
करीतसे अन् कटू वास्तवाचा
निषाद नवा!

जाणीवाहि नव्या उघड्या नागड्या
करिती नर्तन बेहोषपणें
सत्यस्वरूप स्वतःचें दावीत
निर्भयतेनें!
कसेसेंच परी होतसे आंतून
अमित युगांच्या संस्कारबद्ध
'सोवळ्या' मनाला!
भोंवळ येते सारखी मधून
कण्हत नि तें विनवी व्यर्थ—
'नकोच हवा
हा बदल नवा!'

—श्री. पुरुषोत्तम पाटील





अनुक्रमणिका

श्री. शिवाजी नरहर भावे

# न वा   मृ ग

## मार्गशीर्षाला विभूतिमत्त्व कां आलें ?

'मासानां मार्गशीर्षोऽहं ऋतूनां कुसुमाकरः ।' (गी. १०-३५). भगवद्गीतेंत दहाव्या अध्यायांत भगवंतांनी मार्गशीर्ष आणि वसंत ऋतु ह्या दोन विभूती सांगितल्या आहेत. पैकीं वसंताला विभूतिमत्त्व येण्याचें कारण भगवद्वाक्यांत स्पष्ट आहे. 'पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति' (गी. ९-२६) या वाक्यांत ज्या पूजाद्रव्याचा स्पष्ट उल्लेख आहे, तें पूजाद्रव्य ज्या ऋतूंत अपरंपार तयार होतें, तो ऋतु सहजच विभूति ठरला. एवढ्यासाठींच भगवंतांनी वसंत शब्द न वापरतां मुद्दाम कुसुमाकर शब्द वापरला आहे. मार्गशीर्ष महिन्याला विभूतिमत्त्व येण्याचें असें कोणतें कारण आहे ? कुसुमाकर शब्दाप्रमाणें मार्गशीर्ष शब्दांत तें कारण कांहीं दृग्गोचर होत नाहीं. पण ज्याप्रमाणें दिवसा सृष्टीवर वसंत पूजाद्रव्याचा वर्षाव करतो, त्याप्रमाणें रात्रीं मार्गशीर्ष महिना आकाशांगणाला तारारूपी फुलांनीं नटवतो, हें दोहोंतलें साद्दश्य पाहण्यासारखें आहे. या साद्दश्यामुळेंच मार्गशीर्षाला विभूतिमत्त्व आलें असावें. फरक इतकाच कीं कुसुमाकर शब्दाप्रमाणें मार्गशीर्ष शब्द या कल्पनेचें स्पष्ट सूचन करणारा नाहीं. मार्गशीर्षांतच ताऱ्यांची विशेष शोभा असण्याचें कारण मृगनक्षत्र आणि त्याच्या सभोंवतालचे तारापुंज यांच्याइतका भव्य आणि प्रेक्षणीय भाग सबंध आकाशांत दुसरीकडे कोठेंहि दिसून येत नाहीं.

या मृगनक्षत्राच्या अद्भुतरम्य ताराविभागाकडे फार प्राचीन काळापासून मनुष्यजातीचें लक्ष वेधलें आहे असें दिसून येतें. लो. टिळकांनीं या नक्षत्रासंबंधीं लिहिलेल्या आपल्या "ओरायन" ग्रंथांत यांतलि पाश्चात्य आणि पौर्वात्य कथासंबंधीं पुष्कळ विचार केला आहे. त्यावरून भारतीयांनीं व इतर आर्य पूर्वजांनीं हें नक्षत्र एक मोठें आध्यात्मिक स्मारक मानलें आहे असें स्पष्ट भासतें. उदा०—'यमलोकाच्या द्वाराशीं इंद्रानें नमुचीचें शिर छेदन करून टाकलें तेंच मृगनक्षत्र' ही वैदिक कथा सदसद्वृत्तींचा लढा व सद्वृत्तीचा विजय सुचवते. याशिवाय यासंबंधीं इतर ग्रीक, जर्मन इ० पाश्चात्य व पौर्वात्य कथा आहेत. त्यांत आभिलाषा, बाण व शीर्षच्छेदन इ० गोष्टी सामान्य दिसून येतात. कन्येचा अभिलाष धरणाऱ्या प्रजापतीचें मृगशीर्ष हें शिर आहे या प्रसिद्ध भारतीय कथेंतहि हीच वस्तु आहे. तात्पर्य, या कथांवरून वर सांगितलेल्या सदसद्वृत्तींच्या लढ्याचें जास्त स्पष्टीकरण होतें. विषयवासनारूप असद्वृत्तीशीं वैराग्यरूप सद्वृत्ति लढत आहे हेंच तें स्पष्टिकरण. युद्ध=विषयवासनेशीं युद्ध असें समीकरण एकंदर कथांवरून स्पष्ट होतें. अशा तऱ्हेचें एक मोठें आध्यात्मिक स्मारक ज्या महिन्यांत रात्रभर डोळ्यापुढें उभें राहतें त्या महिन्याला विभूतिमत्त्व कां येऊं नये ? खुद्द भगवद्गीतेंतील युद्धहि अशाच तऱ्हेचें एक फार मोठें आध्यात्मिक स्मारक आहे.

## मृगनक्षत्रपुंजांतील तारे

ज्या मृगनक्षत्रामुळें मार्गशीर्षाला विभूतिमत्त्व आलें आहे, त्याची सामान्य माहिती देऊन, मग त्यांतील सुचलेला विशेष म्हणजे नवा मृग दाखवूं. पूर्वी नक्षत्रापासून वर्षारंभ होत असे, म्हणून याला अग्रहायन असेंहि नांव आहे. यावरूनच 'ओरायन' हे





अनुक्रमणिका

इंग्रजी नांव आलें असावें असें लो. टिळकांनीं सुचविलें आहे. जुन्या कल्पनेप्रमाणें म्ह० तैत्तिरीय श्रुति, नक्षत्रकल्प, वृद्धगार्गीयसंहिता इ० जुन्या ग्रंथांप्रमाणें मृगाचे तीनच तारे मानले जातात. परंतु हल्लीं मृगाचे बहुधा दहा तारे मानले जातात. या दहा ताऱ्यांशिवाय उत्तरेकडचे लहान तीन तारेहि यांत धरण्याची पद्धति आहे. युरोपियन मृग-पुंजाची मर्यादा थोडी जास्त आहे. म्हणजे मृगाच्या या तेरा ताऱ्यांखेरीज आणखी पूर्वेकडचे आणि उत्तरेकडचे कांहीं तारे युरोपियन मृगाकृतींत घेतात. मृगाच्या भोंवतीं (१) वृषभ (२) यमुना (३) शशक (४) बृहल्लुब्धक (५) शृंगाश्व (६) प्रश्वन् (७) मिथुन (८) ब्रह्महृदय हे पुंज आहेत. जवळच आकाशगंगाहि आहे. हा सर्व प्रदेश अत्यंत रमणीय आणि तेजस्वी ताऱ्यांनीं खचून भरलेला आहे. मृगांतील बेटेलम्स, रीगेल, व्याध, रोहिणीचा योगतारा हे चार तारे मिळून एक प्रचंड हीरकाकृति तयार होते. इतका सुंदर हिरा आकाशांत हा एकच आहे. प्रश्वन्, व्याध, बेलेट्रिक्स आणि रीगेल मिळूनहि असाच एक सुंदर प्रचंड हिरा तयार होतो. व्याध, रीगेल, बेटेलम्स व रोहिणीचा योगतारा व नाथ मिळून एक मोठा 'डब्ल्यू' तयार होतो. अशा तऱ्हेच्या मनोहर आकृती या पुंजांतील तारे व आसपासचे तारे मिळून तयार होतात. त्याशिवाय रोहिणीची 'ए'प्रमाणें अगर 'व्ही'प्रमाणें अगर 'एन्'प्रमाणें आकृति, बृहल्लुब्धकांतील काटकोण, मिथुनांतील होडी, ब्रह्महृदयांतील मुकुट, कृत्तिकांचा द्राक्षाचा घड या रमणीय दृश्यांनीं आसपासचा भाग सुशोभित झाला आहे. खुद्द मृगांत बेटेलम्स व रीगेल म्ह० अल्फा व बिटा हे दोन पहिल्या प्रतीचे तारे आहेत. गामा, डेल्टा, एपसीलन व झेटा म्ह० बेलेट्रिस, अल् मिंटेका, अल् नीलम् व अल् निटेक हे तारे दुसऱ्या प्रतीचे आहेत. सॅइफ हा तीसऱ्या प्रतीचा तारा आहे. यापुढील प्रतीचे पुष्कळ तारे या पुंजांत आहेत. दोन तेजोमेघ असून त्यांतील एक नुसत्या डोळ्यांनीं (निरभ्र आकाशांत) दिसतो. अल् मिंटेका हा तारा बरोबर विषुववृत्तावर असल्यामुळें मावळतांना व उगवतांना बरोबर पूर्व-पश्चिम बिंदु दाखवितो. बेटेलम्स हा एक अनियमित कालाचा रूपविकारी तारा असून अगदीं लाल रंगाचा आहे. इतर तारे बहुधा चकचकीत निळसर रंगाचे आहेत. मृगनक्षत्रापासून सध्यां पावसाची सुरुवात होते. पूर्वीं मृगनक्षत्र वसंताची सुरुवात करी, असें लो. टिळकांनीं लिहिलें आहे. मृगांतील बेटेलम्स ताऱ्यालाच कित्येक आर्द्रा समजतात. मृगाची देवता सोम समजली जाते. पण आर्द्रेची देवता रुद्र असल्यामुळें तिचाहि मृगाशी संबंध आहे हें मानणें अयुक्त ठरणार नाहीं. लेखाच्या शेवटीं आकृति नं. १ मध्यें नकाशा या माहितीच्या उपयोगासाठीं दिलेला आहे; तो पहावा.

## नवा मृग

मृगाच्या आकृतीसंबंधीं निरनिराळ्या कल्पना केल्या आहेत. कोणी पूर्ण मृगाची कल्पना न करतां मृगशीर्ष म्हणजे फक्त डोकेंच घेतात. कोणी मृग-चर्माची कल्पना करतात. युरोपियन लोक मृगाची कल्पना न करतां ओरायन म्ह० शिकारी माणसाची कल्पना घेतात. त्याशिवाय मुसलमानांनीं थडग्याची कल्पनाहि केलेली आहे. कोणी दत्तात्रेयाच्या देवळाची कल्पना बसतात. संपूर्ण मृगाची कल्पनाहि पुष्कळांनीं केली आहे. परंतु उत्तम प्रकारें मृगाकृति तयार झालेली दिसत नाहीं. या सर्व कल्पनांशिवाय अगदीं स्वतंत्र अशी मृगाची एक कल्पना येथें मांडावयाची आहे. ही कल्पना ऐतिहासिक दृष्टीनें कितपत सत्य आहे हें मुळींच पहावयाचे नाहीं. तें काम इतिहासतज्ज्ञांचें. येथें आपल्या डोळ्यांना ही कल्पना कितपत पटते एवढेंच पहावयाचें आहे. मृग-नक्षत्र पूर्वेला सुमारें चाळीस अंशावर त्यावेळीं येतें त्या वेळीं पुढें दाखवावयाची आकृति उत्तमोत्तम दिसते. नवा मृग तयार होण्यासाठीं यमुनेंतील कांहीं तारे आपणांस घ्यावे लागतील. हे तारे म्हणजे मृगाचें शिंग होय. मृगाचे पूर्वेकडील तारे हे मृगाचें दुसरें शिंग. रीगेल हें तोंड. रीगेलपासून त्रिकांडाच्या जवळच्या उभ्या तीन ताऱ्यांपर्यंत उतरणारी लहान ताऱ्यांची रांग ही मृगाची मान, सॅइफ








हे पुढचे दोन पाय, बेटेलम्स हे मागचे दोन पाय. मृगाच्या उत्तरेकडील तीन लुकलुकणारे लहान तारे ही शेंपटी, अशा तऱ्हेचा हा अत्यंत सुंदर मृग तयार होतो. मृगाची याच्यासारखी सर्वांगपरिपूर्ण आकृति अजून कोणी दाखवूं शकला नाहीं. ही आकृति सहज डोळ्यापुढें आलेली म्हणून मांडलेली आहे. मुद्दाम बसविलेली नाहीं. काळ्याभोर रात्रीं निळ्या आकाशांत चकचकणारा हा नवा मृग एकदां पाहिला म्हणजे पुन्हां त्याची विस्मृति होणें शक्य नाहीं. ही आकृति पुढें लेखाच्या शेवटा आकृति नं. २मध्यें स्पष्ट दिली आहे. ती पाहून आम्हांला वैराग्याच्या उज्ज्वल भावनेची प्रेरणा प्राप्त होवो.

आकृति नं. १




मृगनक्षत्रपुंज

आकृति नं. २

नवा मृग







प्रा. अ. रा. कामत

# अणुशक्तीचें राजकारण

अमेरिकन सत्ताधाऱ्यांनीं १९४५ च्या ऑगस्ट महिन्यांत जपानवर दोन अणुबॉम्ब टाकले. अणुशक्तीचें गुपित हस्तगत झालें ही गोष्ट अशा भयानक तऱ्हेनें जगाच्या प्रथम नजरेस आली. तेव्हांपासून अणुशक्ति, तिचें नियंत्रण आणि तत्संबंधीचें राजकारण या विषयांवर अनेक लेखकांनीं अनेक पुस्तकें लिहिलीं. इंग्लंड-अमेरिकेकडून येणाऱ्या या विषयावरील बहुतेक वाङ्मयांत अणुशक्तीच्या परिणामांचें अतिरंजित, भयानक आणि अवास्तव ( unrealistic ) असें चित्र रंगविलेलें असतें. ज्याचे हातीं अणुगोल तो जगाचा स्वामी अशी सामान्य वाचकांची समजूत करून देणें हाच उद्देश बऱ्याचशा अमेरिकन लिखाणांत प्रामुख्यानें दिसून येतो. अणुबॉम्बचा धाक दाखवून जगावर प्रभुत्व सांगूं पाहणाऱ्या अमेरिकन सत्ताधाऱ्यांच्या आक्रमक धोरणाला यामुळें एकप्रकारें पुष्टि मिळत असे.

गेल्या वर्षी सुप्रसिद्ध इंग्रज शास्त्रज्ञ **प्रोफेसर पी. एम्. एस्. ब्लॅकेट**[1] यांनीं '**अणुशक्तीचे रणनैतिक आणि राजनैतिक परिणाम**' हें पुस्तक लिहून प्रसिद्ध केलें. शास्त्रज्ञाच्या वास्तववादी व चिकित्सकी दृष्टिकोनांतून लिहिलेल्या या पुस्तकामुळें वर वर्णिलेल्या रूढ वाङ्मय-प्रकाराला जोराचा धक्का बसला. पाश्चात्य देशांत या पुस्तकानें बरीच खळबळ उडविली, आणि विचारी वाचकवर्गांत प्रो. ब्लॅकेट यांच्या विवेचनाला बरीच मानमान्यता मिळाली. हिंदुस्थानांत कांहीं इंग्रजी नियतकालिकांनीं या पुस्तकाला कांहीं अंशीं प्रसिद्धि दिली. पण मराठी वाचकांना प्रो. ब्लॅकेट यांच्या विचारसरणीचा परिचय करून दिल्याचे माझ्या पाहण्यांत नाहीं. वर उल्लेखिलेल्या अ-वास्तववादी, अतिरंजित अमेरिकनी प्रचाराचे पडसाद मात्र आपल्याकडील इंग्रजी व देशभाषेंतील वृत्तपत्रीय लिखाणांत नेहमीं उमटतात. ( उदाहरणार्थ, **ज्ञानप्रकाश**, ता.

---

[1] **प्रो. ब्लॅकेट** यांचा जन्म १८९७ सालीं झाला. प्रथम ते नाविक-दलांतील अधिकारी होते. पहिल्या महायुद्धाचीं चार वर्षे नाविकदलांत घालविल्यावर ते केंब्रिजला संशोधनासाठीं गेले. तेथें प्रख्यात संशोधक **रूदरफोर्ड** यांचे हाताखालीं त्यांनीं अणुविषयक आणि कॉस्मिक किरणांसंबंधीं संशोधन केलें. १९३३ सालीं त्यांना रॉयल सोसायटीनें फेलो निवडलें. १९३७ सालापासून ते मँचेस्टर विश्वविद्यालयांत पदार्थविज्ञानाचे प्रोफेसर आहेत. जगांतील नामवंत शास्त्रज्ञांत त्यांची गणना होते आणि निरनिराळ्या देशांतून अनेक विद्यार्थी त्यांचे हाताखालीं संशोधन करण्यासाठीं येत असतात. १९४८ सालीं त्यांना नोबेल पारितोषिक देण्यांत आलें.

दुसऱ्या महायुद्धांत पाणबुड्याविरुद्ध मोहिमेसंबंधीं व इतर युद्धविषयक बाबतींत त्यांनीं संशोधनात्मक साहाय्य केलें. युद्धानंतर ब्रिटिश सरकारनें अणुशक्तीविषयीं सल्लामसलत देणाऱ्या समितीवर सभासद म्हणून त्यांची नेमणूक केली. १९४८ सालीं ती समिति बरखास्त होईपर्यंत ते त्या समितीवर काम करीत होते. अणुशक्तीविषयीं त्यांचा अधिकार मोठा समजला जातो.



अनुक्रमणिका

२-११-४९ चा अग्रलेख पाहा). सोव्हिएट राशियाला अणुबॉम्बचें गुपित अवगत आहे अशी कबुली आतां इंग्लंड-अमेरिकेंतील सत्ताधाऱ्यांनीं सुद्धां दिल्यामुळें हा प्रश्न पुन्हां एकदां प्रामुख्यानें चर्चिला जात आहे. अशा वेळीं प्रो. ब्लॅकेट यांचे या विषयावरील विचार वाचकांना निःसंशय उद्बोधक वाटतील.

## पुस्तक लिहिण्याचा हेतु

ब्रिटिश सरकारनें नेमलेल्या सल्लागार-समितीवर काम करीत असतांना प्रो. ब्लॅकेट यांचे आपल्या सहकाऱ्यांशीं तीव्र मतभेद निर्माण झाले. अणुशक्तीच्या नियंत्रणाविषयीं ब्रिटननें स्वीकारलेलें धोरण अमेरिकेच्या धोरणाहून वेगळें नाहीं, या धोरणामागील विचारसरणी लष्करी दृष्ट्या अ-वास्तववादी (unrealistic) असून या धोरणाचे परिणाम राजकीय दृष्ट्या अनिष्ट होणार आहेत असें त्यांचें निश्चित मत बनलें. सहकाऱ्यांशीं झालेल्या मतभेदामागें दोन मुख्य कारणें आहेत असें त्यांस आढळून आलें :

(१) अमेरिका आणि सोव्हिएट रशिया यांसारख्या एकमेकांपासून दूर अंतरावर असलेल्या महान् राष्ट्रांत महायुद्ध सुरू झालें तर अशा युद्धांत अणुशस्त्र किती प्रमाणांत प्रभावी ठरेल याविषयीं त्यांचें मत त्यांच्या सहकाऱ्यांच्या मताहून भिन्न होतें.

(२) आजच्या जागतिक परिस्थितींत कोणतें राजकारण व्यवहार्य आहे याविषयींहि त्यांचें मत सहकाऱ्यांच्या मताहून वेगळें होतें.

स्वतःचे अंदाज अधिक स्पष्ट व पायाशुद्ध व्हावे या उद्देशानें प्रो. ब्लॅकेट यांनीं अणुशस्त्राचा भावी युद्धतंत्रावर कोणता परिणाम होईल यासंबंधीं विस्तृत अभ्यास करण्याचें ठरविलें. याकरितां गेल्या युद्धांतील बॉम्बहल्ल्याच्या परिणामांची त्यांनीं तपशीवार छाननी केली. पण ते एवढेंच करून थांबले नाहींत. अणुशक्तीच्या नियंत्रणाची योजना यशस्वी व्हावयाची तर ती लष्करी दृष्ट्या जशी वास्तववादी असली पाहिजे तशी ती राजकीय दृष्ट्याहि वास्तववादी असणें जरूर आहे, अणुशस्त्रामुळें लष्करी क्षेत्रांत घडून आलेले परिणाम आणि राजकीय क्षेत्रांत होणारे परिणाम यांची फारकत करणें योग्य नाहीं, अशी प्रो. ब्लॅकेट यांची ठाम समजूत असल्यानें त्यांनीं या प्रश्नाचा आंतरराष्ट्रीय राजकारणाच्या दृष्टीनेंहि अभ्यास केला.

इंग्रज-अमेरिकन सत्ताधाऱ्यांनीं अणुशक्तीविषयीं आज जे धोरण स्वीकारलें आहे त्याहून प्रो. ब्लॅकेट यांचे निष्कर्ष अगदीं निराळे आहेत. ब्रिटन-अमेरिकेचें धोरण भलत्या मार्गानें चाललें आहे अशी त्यांची पक्की खात्री झाल्यामुळें त्यांनीं अणुशक्तीच्या लष्करी व राजकीय परिणामांसंबंधीं टांचणें लिहून काढलीं. १९४८ सालीं ब्रिटिश सरकारनें सल्लागार-समिति बरखास्त केली. त्यानंतर प्रो. ब्लॅकेट यांनीं आपलीं टांचणें प्रस्तुत पुस्तकाच्या रूपानें प्रसिद्ध केलीं.

पुस्तकाच्या सुमारें दोनशें पानांत इतकी माहिती भरगच्चपणें दिलेली आहे कीं त्या माहितीचा व त्यावरून निघणाऱ्या सर्व अनुमानांचा व निष्कर्षांचा योग्य परामर्श या लेखांत घेणें शक्य होणार नाहीं. म्हणून प्रो. ब्लॅकेट यांच्या विचारसरणींतील फक्त ढोबळ मुद्दे आणि निष्कर्ष पुढें दिले आहेत.

## दुसऱ्या महायुद्धांतील बॉम्बहल्ले

अणुबॉम्ब निघाल्यापासून अणुबॉम्बमुळें युद्धतंत्रांत निर्णायक बदल झाला आहे अशी कल्पना प्रसृत झाली आहे. अणुगोलांच्या साहाय्यानें कोणत्याहि राष्ट्रावर चढाई करून त्याला अल्पावधींत आणि स्वतांची फारशी हानि न होतां नमवितां येईल, त्याचप्रमाणें अणुगोलांच्या दहशतीच्या जोरावर आंतरराष्ट्रीय संघटनेला आंतरराष्ट्रीय करार मोडणाऱ्या आक्रमक राष्ट्राला तात्काळ वठणीवर आणतां येईल, अशा प्रकारचीं विधानें अनेकदां केलेलीं आढळतात, याचें कारण हेंच आहे. ब्रिटन व अमेरिका यांनीं पुरस्कारलेली अणुशक्तीच्या नियंत्रणाची '**बरुक योजना**'हि अणुबॉम्बच्या प्रभावीपणाविषयींच्या अशाच तऱ्हेच्या अवास्तव अंदाजांवर आधारलेली आहे असें प्रो. ब्लॅकेट यांनीं वाटतें. म्हणून अणुशस्त्राच्या परिणामकारकतेविषयीं शक्य तितका शास्त्रशुद्ध अंदाज बांधणें जरूर होतें.





अनुक्रमणिका

आजपर्यंत अणुशस्त्राचा वापर युद्धामध्यें फक्त दोनदांच झाला आणि तोहि अगदीं विशिष्ट परिस्थितींत झाला. तेव्हां अणुशस्त्राच्या प्रभावीपणाविषयीं अंदाज बांधतांना या दोन अणुहल्ल्यांबरोबरच गेल्या महायुद्धांत उपयोगांत आणलेल्या संहारसाधनांच्या, विशेषतः बॉम्बहल्ल्यांच्या प्रभावीपणाचें मोजमाप करणें जरूर होतें.

इंग्लंड-अमेरिकेनें जर्मनीवर केलेल्या प्रचंड बॉम्बहल्ल्याच्या परिणामकारकतेचा अभ्यास करणें आवश्यक वाटावें याला दुसरेंहि एक कारण आहे. लांब पल्ल्याच्या विमानांतून मोठ्या प्रमाणावर बॉम्बफेक करून एखाद्या प्रबळ शत्रुराष्ट्रालाहि पराभूत करणें शक्य आहे असा समज पहिल्या महायुद्धानंतर बरीच मान्यता पावला होता. हवाई बॉम्बहल्ले हें निर्णायक युद्धसाधन आहे हा सिद्धांत मुळांत इटलीचा फॅसिस्ट जनरल दौहे यानें मांडला होता आणि ब्रिटिश रणपंडितांनाहि तो सिद्धांत प्रिय होता. यामुळेंच दुसऱ्या महायुद्धापूर्वींच्या काळांत ब्रिटिश युद्धखात्याचें धोरण लांब पल्ल्याच्या विमानांवर भर देण्याचें होतें; आणि प्रत्यक्ष युद्ध सुरू झाल्यावरहि १९४४ मध्यें फ्रान्समध्यें दुसरी आघाडी उघडीपर्यंत ब्रिटन अमेरिकेचा मुख्य भर जर्मनीचे कारखाने आणि शहरें यांवर संहारक विमानहल्ले करणें यावरच होता.

प्रो. ब्लॅकेट यांनीं विमानहल्ल्यांच्या परिणामकारकतेविषयीं उपलब्ध असलेल्या अधिकृत माहितीचा तपशिलवार अभ्यास केला. त्यांना काय आढळलें? इंग्रज-अमेरिकन विमानांनीं शत्रूवर एकूण २७ लक्ष टन वजनाचे बॉम्ब टाकले आणि यांपैकीं निम्मी आग जर्मनींतील शहरांवर ओकलेली होती. विशेषतः १९४३ पासून हे विमानहल्ले चांगलेच जोराचे होते. पण यामुळें जर्मन युद्धप्रयत्नावर फारसा परिणाम झाल्याचें दिसत नाहीं. १९४३ सालीं जर्मनीचें एकंदर औद्योगिक उत्पादन फक्त १० टक्के घटलें आणि युद्धोपयोगी उत्पादनांत तर फक्त पांचच टक्के घट आली. तेव्हां लांब पल्ल्याची बॉम्बफेक हें साधन निर्णायक तर नाहींच, पण त्याची परिणामकारकता सुद्धां बरीच कमी असल्याचें दिसून येतें. मग जर्मनीचा पराभव होण्यास मुख्य कारण कोणतें झालें? रशियन आघाडीवर जर्मनीचें सैनिक बल आणि युद्धसाहित्य यांचा जो प्रचंड संहार झाला त्यामुळेंच जर्मनीचें मरण ओढवलें; एकूण नष्ट झालेल्या जर्मनीच्या सैनिक-संख्येपैकीं ७५ टक्के सैनिक रशियन आघाडीवर कामास आले, यावरून हीच गोष्ट दिसून येते, हें प्रो. ब्लॅकेट यांनीं नमूद केलें आहे. तेव्हां दुसऱ्या महायुद्धाचा अनुभव पाहिला तर लांब पल्ल्याचे विमानहल्ले हे युद्ध जिंकण्याच्या कामीं मुळींच निर्णायक ठरले नाहींत. भावी युद्धांत अणुशस्त्र किती प्रमाणांत प्रभावी ठरेल याचा अंदाज बांधतांना हा अनुभव लक्षांत घेतला पाहिजे असें प्रो. ब्लॅकेट यांचें म्हणणें आहे.

## अणुबॉम्ब हें निर्णायक शस्त्र आहे काय?

अणुशस्त्राच्या भावी युद्धतंत्रांतील प्रभावीपणाविषयीं अंदाज बांधतांना प्रो. ब्लॅकेट यांनीं जर्मनी व जपान यांवरील विमानहल्ले आणि जपानवर टाकलेल्या दोन अणुगोलांनीं केलेला संहार या सर्व गोष्टींचा तपशील काळजीपूर्वक विचारांत घेतला आहे. त्याचप्रमाणें अणुबॉम्बपासून बचाव करण्याचीं साधनें, अणुबॉम्ब नेण्यासाठीं लागणारीं विमानें वगैरेंचा आणि या सर्व साधनांत पुढील कांहीं वर्षांत किती प्रगति होईल याचाहि विचार केला आहे. या सर्वांचा विचार करतां प्रो. ब्लॅकेट यांनीं असा निष्कर्ष काढला आहे कीं अणुबॉम्ब हें फक्त (मनुष्य व मालमत्ता यांचा) मोठ्या प्रमाणांवर संहार करण्याचें साधन आहे. प्रत्यक्ष युद्ध करणाऱ्या सैन्याला अणुबॉम्बचा उपयोग अगदीं मर्यादित प्रमाणांतच होऊं शकेल असें त्यांचें मत आहे.

अणुशस्त्राविषयींचें विवेचन अधांतरीं राहूं नये म्हणून प्रो. ब्लॅकेट यांनीं अमेरिका व रशिया यांमधील संभाव्य युद्धाच्या अनुरोधानेंच हें सर्व विवेचन केलें आहे. त्यांतहि अधिक निश्चितता येण्यासाठीं रशियाला अणुशस्त्र उपलब्ध होण्यापूर्वींचा व नंतरचा असे दोन कालखंड त्यांनीं कल्पिले होते. यांपैकीं पहिल्या कालखंडाविषयींच्या अंदाजांना प्रत्यक्ष परिस्थितींत आतां फारसें महत्त्व राहिलेलें नसलें तरी शास्त्रशुद्ध विचारांच्या दृष्टीनें त्यांना अद्यापहि बरेंच महत्त्व आहे. अणुगोल, ते

नेणारीं विमानें, आणि त्यापासूनच्या बचावाचीं साधनें यांमध्यें पुढील दहा वर्षांच्या अवधींत होणारी संभाव्य प्रगति आणि प्रत्यक्ष युध्यमान होण्याचा संभव असणारीं राष्ट्रें या सर्वांचा विचार करून प्रो. ब्लॅकेट यांनीं पुढील निष्कर्ष काढले आहेत : दूरच्या खंडांत असलेल्या बलवान् राष्ट्राला नमविण्याच्या कामीं अणुबॉम्ब हें शस्त्र निर्णायक ठरणार नाहीं, आणि जवळच्या लहान राष्ट्राला जिंकण्यासाठीं अणुबॉम्बसारखें संहारसाधन वापरण्याची जरूरी पडणार नाहीं! खुद्द अमेरिका व सोव्हिएट रशिया यांमधील संभाव्य युद्धाचा विचार केला–(हेंच युद्ध अणुबॉम्बचा विचार करतांना अनेकांच्या डोळ्यांसमोर असतें)–तर एकंदर परिस्थितीकडे लष्करी व राजकीय दृष्टया पाहातां असें युद्ध जागतिक स्वरूपाचें होईल, त्यामध्यें अणुबॉम्ब हें शस्त्र निर्णायक ठरणार नसून सर्व शस्त्रसाधनें वापरलीं जातील आणि तें युद्ध बराच काळ चालेल, असा निष्कर्ष ब्लॅकेट यांनीं काढला आहे. तेव्हां अणुबॉम्ब हें युद्ध जिंकण्याचें निर्णायक शस्त्रसाधन आहे, यामुळें अल्पावधींत आणि स्वतांला फारशी तोशीस न लागतां युद्ध जिंकता येईल इत्यादि कित्येक इंग्रज-अमेरिकन गोटांत रूढ असलेले अंदाज केवळ साम्राज्यवाद्यांच्या मनचे मांडे आहेत ही गोष्ट स्पष्ट होते.

## जपानवरील अणुहल्ल्यांची मीमांसा

जपानवर ६ आणि ८ ऑगस्ट १९४५ या दोन दिवशीं दोन अणुबॉम्ब टाकण्यांत आले आणि १४ ऑगस्ट रोजीं जपानी सरकारनें संपूर्ण शरणागति दिली. या घटनेवरून अणुबॉंब हें युद्ध जिंकण्याचें निर्णायक साधन आहे असें म्हणणें बरोबर नाहीं असें प्रो. ब्लॅकेट यांचें म्हणणें आहे. जपानभोंवतीं आवळलेला अमेरिकन नाविकदलाचा वेढा, जपानवर होत असलेले विमानहल्ले, आणि सर्व आघाड्यांवर जपानची झालेली नाकेबंदी यामुळें जपानी साम्राज्यवादी अगदीं टेंकीस आले होते. त्याचप्रमाणें ९ ऑगस्ट १९४५ पासून लाल सेनेनें वेगवान् चढाई सुरू केली होती. अशा विशिष्ट परिस्थितींत अणुबॉंबमुळेंच जपानचा पराभव झाला असा निष्कर्ष काढणें बरोबर होणार नाहीं. (चीनमधील अमेरिकन सेनापती चेनॉट यांच्या मतें तर लाल सेनेच्या चढाईमुळेंच जपान शरण आला!) आणि त्या अनुभवावरून अणुशस्त्र हें कोणतेंहि महायुद्ध जिंकण्याचें निर्णायक साधन आहे असें प्रतिपादणें तर त्याहूनहि बरोबर नाहीं असें प्रो. ब्लॅकेट यांचें मत आहे.

जपानवरील अणुहल्ल्यांविषयीं आणखी एक महत्त्वाचा प्रश्न उभा राहातो. वास्तविक जपान आधींच टेंकीस आला होता, आणि लाल सेनेची चढाई आणि अमेरिकन सैन्याची चढाई या गोष्टी ठरलेल्या होत्या. अशा परिस्थितींत जपानचा निकाल फक्त कांहीं महिन्यांच्या अवधींत लागणार हें अगदीं उघड दिसत होतें. मग अमेरिकन सत्ताधाऱ्यांनीं जपानी शहरांवर अणुबॉंबसारखीं भयंकर संहारक अस्त्रें कां टाकलीं ? अणुबॉम्ब वापरल्यामुळें युद्धकाल एकदम कमी झाला आणि त्यामुळें लक्षावधि अमेरिकन सैनिकांचे प्राण वांचले असें या प्रश्नाचें उत्तर अमेरिकन सत्ताधारी देतात. पण प्रो. ब्लॅकेट यांच्या मतें या उत्तरांत तथ्य नाहीं. अणुगोलासारखें संहारसाधन वापरल्यामुळें स्तंभित झालेल्या अमेरिकन व जागतिक जनतेच्या समाधानासाठीं म्हणून हें उत्तर देण्यांत येतें, हें कांहीं अणुगोल वापरण्याचें खरें कारण नाहीं असा प्रो. ब्लॅकेट यांचा साधार तर्क आहे.

या तर्काच्या पुष्टयर्थ ते पुढील कारणें देतात : जपानी भूमीवर अमेरिकन सेना उतरविण्याचा प्रयत्न नोव्हेंबर १९४५ नंतर होणार होता. तेथपर्यंत जपानवर विमानहल्ले चालू राहाणार होते. आणि मांच्युरियांत लाल सेना चढाई करणार होती. यामुळें जपान कदाचित् आधींच नमला असता. शिवाय नोव्हेंबरच्या चढाईपर्यंत अमेरिकन सैनिकांची फारशी हानि होण्याचा मुळींच संभव नव्हता. तेव्हां वरील कारण तात्कालिक दृष्टया फारसें महत्त्वाचें दिसत नाहीं. तशांत जपानवर अणुबॉम्ब टाकूं नये असा इषारा अमेरिकन शास्त्रज्ञांच्या समितीनें जून १९४५ मध्यें दिला होता. हें भयानक अस्त्र नागरी जनतेवर टाकून मनुष्यसंहार केला तर आंतरराष्ट्रीय राजकीय संबंध सलोख्याचे राहाणार नाहींत, अणुशस्त्र निर्माण करण्याची








चढाओढ सुरू होऊन जगावर संकट कोसळेल, आणि शिवाय लष्करी दृष्ट्यासुद्धां जपानचा पराभव करण्यासाठीं अणुगोल वापरण्याचें कारण नाहीं असें या शास्त्रज्ञांनीं आपलें स्पष्ट मत व्यक्त केलें होतें. जपाननें शरणागति पत्करावी याबद्दल गुप्त खलबतेंहि यावेळीं चालू होतीं.

अशा परिस्थितींत जुलै महिन्यांत न्यू मेक्सिकोच्या निर्जन प्रदेशांत केलेला अणुशस्त्राचा पहिला प्रयोग यशस्वी होतांच अमेरिकन सत्ताधाऱ्यांनीं आपल्या सोव्हिएट दोस्ताला बिलकूल सुगावा लागू न देतां पूर्वीं ठरविलेलें धोरण अचानक बदललें. शास्त्रज्ञांच्या सल्ल्याला न जुमानतां त्यांनीं जपानवर अणुशस्त्र वापरावयाचें ठरविलें, आणि त्यावेळीं फक्त दोनच अणुबॉम्ब तयार होते, तरीसुद्धां त्यांनीं ते दोन्ही पूर्वसूचनासुद्धां न देतां जपानी शहरांवर भिरकावून दिले. या घिसाडघाईची उपपत्ति कशी लावावयाची ?

प्रो. ब्लॅकेट यांच्या मतें याचें कारण फक्त एकच संभवतें. युरोपांतील युद्ध संपल्यापासून तीन महिन्यांच्या आंत आपण जपानवर चढाई करूं असें सोव्हिएट रशियानें ब्रिटिश-अमेरिकन दोस्तांस अभिवचन दिलें होतें आणि त्याचप्रमाणें त्याची जय्यत तयारी चालू होती. सोव्हिएट लाल सेना आखाड्यांत उतरली, आणि तिनें मांचुरियांतील अव्ययावत् जपानी सेना नष्ट करण्याची कामगिरी पार पाडली कीं पूर्वेकडील राजकारणांत सोव्हिएट रशियाचें पारडें भारी होईल, मग जपानचें भवितव्य एकट्या अमेरिकेला ठरवितां येणार नाहीं याची अमेरिकन सत्ताधाऱ्यांना पुरी कल्पना होती.

युरोपांतील युद्ध संपल्याला ८ ऑगस्ट रोजीं तीन महिने पुरे व्हावयाचे होते; तेव्हां सोव्हिएट रशिया पूर्वेकडील युद्धांत पडण्यापूर्वींच जपाननें आपल्यास शरण यावें या उद्देशानें अमेरिकन सत्ताधाऱ्यांनीं ६ ऑगस्ट रोजीं पहिला अणुबॉम्ब टाकला आणि ८ ऑगस्टला उरला-सुरला दुसरा बॉम्बहि सोडून दिला असें प्रो. ब्लॅकेट यांचें मत आहे. अमेरिकन सैनिकांची प्राणहानि वांचविली ही मागाहून केलेली सबब असावी असें त्यांचें म्हणणें आहे. तेव्हां अणुबॉम्बच्या पहिल्या वापराचें कारण लष्करी आवश्यकता हें नसून सत्तातुर राजकारणांतील पवित्रा हेंच असल्याचें दिसून येतें. प्रो. ब्लॅकेट यांच्या शद्बांत सांगावयाचें तर जपानवरील अणुहल्ले हें " दुसऱ्या महायुद्धांतील लष्करी मोहिमेचें भरतवाक्य नसून अमेरिकेनें रशियाविरूद्ध सुरू केलेल्या राजनैतिक मोहिमेची ती नांदीच समजणें योग्य आहे ! "

अणुशस्त्राच्या वापरामागें असलेल्या या सत्तातुर राजकारणावर पांघरूण घालण्यासाठीं, जपान्यांना नमविण्यासाठीं अणुबॉंब हे निर्णायक ठरले, त्यामुळें लक्षावधि अमेरिकन सैनिकांचे प्राण वांचले, असा प्रचार केला जातो. त्याचप्रमाणें अणुबॉंबमुळें भावी युद्धें अगदीं अल्पावधींत आणि फारशी हानि न पोंचतां जिंकतां येतील अशी अमेरिकन जनतेची भुलावणी सुद्धां याच उद्देशानें करण्यांत येते असें प्रो. ब्लॅकेट यांचें म्हणणें आहे. अमेरिकेनें ज्या परिस्थितींत व ज्या तऱ्हेनें अणुबॉंब वापरले त्यामुळें अणुशक्तीच्या नियंत्रणाचा प्रश्न अधिकच बिकट होऊन बसला आहे.

## अणुशक्तीचा शांतताकालीन उपयोग

अणुशक्तीचे शांतताकालीन उपयोग तीन प्रकारचे आहेत : (१) वैद्यकीय उपचारासाठीं, (२) शास्त्रीय संशोधनासाठीं व (३) उष्णता व यंत्रशक्ति निर्माण कर- ण्यासाठीं. अमेरिकेंतील शास्त्रज्ञ व राजकारणी लोक यांपैकीं पहिल्या दोन उपयोगांवर भर देतात आणि अणुशस्त्रावर नियंत्रण ठेवण्यासाठीं यांत्रिक व औद्यो- गिक उपयोगासाठीं अणुशक्ति वापरण्याचें मना करण्यांत यावें असें प्रतिपादन करतात. अमेरिकेंत कोळसा विद्युत्-शक्ति, खनिज तेलें ( पेट्रोलियम ) इत्यादींपासून यंत्रशक्ति मुबलक उत्पन्न झालेली आहे. यामुळें अमेरिकेला अणुशक्तीचें महत्त्व विशेष न वाटावें यांत नवल नाहीं. पण सोव्हिएट रशिया- सारख्या यंत्रशक्तीमध्यें अमेरिकेच्या मानानें मागें असलेल्या देशाला अणुशक्तीचें या दृष्टीनें अतिशय महत्त्व वाटणें स्वाभाविक आहे असें प्रो. ब्लॅकेट यांचें म्हणणें आहे. अणुशक्तीसाठीं आवश्यक असलेले युरेनियमसारखे खनिज पदार्थ, अणुशक्तीचा औद्योगिक वापर करण्यासाठीं अवश्य असलेलें








शास्त्रीय व तांत्रिक ज्ञान, आणि नव्या यंत्रशक्तीच्या विकासाला वाव व उत्तेजन देणारी समाजपद्धति या सर्व गोष्टी सोव्हिएट रशियांत एकवटल्या आहेत, म्हणून त्या दृष्टीनें अणुशक्तीची तेथें जलद प्रगति होणें शक्य आहे असें प्रो. ब्लॅकेट यांना वाटतें. अणुशक्तीच्या नियंत्रणाविषयींच्या योजनेंत रशिया या मुद्द्यावर इतका भर देतो याचें कारण हेंच.

खुद्द अमेरिकेंतहि यंत्रशक्ति मुबलक असली तरी कित्येक क्षेत्रांत अणुशक्तीचा वापर त्या दिशेनें करणें सोयीचें आणि स्वस्त पडेल असा प्रो. ब्लॅकेट यांचा कयास आहे. अर्थात् सध्यां ज्यांचेकडे यंत्रशक्तीची मक्तेदारी आहे ते अमेरिकन मक्तेदार अणुशक्तीच्या औद्योगिक उपयोगाच्या आड आल्यावांचून राहाणार नाहींत हेंहि त्यांच्या नजरेंतून सुटलेलें नाहीं. अणुशक्तीच्या औद्योगिक उपयोगासंबंधीं अतिशय उपयुक्त अशी माहिती व आंकडेवारी प्रो. ब्लॅकेट यांच्या पुस्तकांत पहावयास सांपडते.

## अणुशक्तीच्या नियंत्रणाच्या योजना

१९४६ च्या जानेवारी महिन्यांत यूनोनें अणुशक्ति व अणुशस्त्रें यांच्या नियंत्रणासाठीं अणुशक्तिसमिति नेमली. या समितीसमोर ठेवण्यांत आलेल्या अमेरिकन **( बरुक ) योजना** आणि सोव्हिएट **( ग्रोमिको ) योजना,** त्यांमधील महत्त्वाचे मतभेदाचे मुद्दे, त्यांसंबंधीं झालेल्या वादचर्चा येथपासून तों मतभेद मिटविण्याचे प्रयत्न अखेर निष्फळ झाल्यामुळें समितीचें काम कसें बंद पडलें येथपर्यंत घडलेल्या घटनांचें प्रो. ब्लॅकेट यांनीं विस्तृत विवरण केलें आहे. १९४७ च्या जून महिन्यांत नवी सोव्हिएट योजना सादर करण्यांत आली. या दोन योजनांतील ठळक मतभेद दाखवून प्रो. ब्लॅकेट यांनीं त्याविषयीं पुढील निष्कर्ष काढले आहेत.

बरुक-योजनेप्रमाणें आंतरराष्ट्रीय अणुनियंत्रण समिति युरेनियम वगैरेच्या सर्व खाणी, अणुस्फोटक द्रव्यांचे कारखाने आपल्या ताब्यांत घेईल व कोणी, किती व कशा प्रकारें अणुशक्ति वापरावयाची हें ठरवील. यासंबंधींच्या सर्व योजना परिपूर्ण झाल्या कीं मगच अणुबॉम्बच्या निर्मितिवर बंदी घालण्यांत येईल आणि असलेले अणुबॉम्बचे सांठे नष्ट करण्यांत येतील. हे सर्व निर्णय समितीनें साध्या बहुमतानें ठरवावयाचे आहेत, तसेंच यापैकीं एखाद्या नियमाचा भंग झाल्यास त्यावर पोलिसी कारवाई करण्याचा निर्णयहि साध्या बहुमतानें घ्यावयाचा आहे. सध्यां यूनोच्या सुरक्षा मंडळांत सर्व महत्त्वाचे निर्णय बड्या पांच राष्ट्रांच्या ऐकमत्यानें घेतले जातात, यालाच " व्हेटो " असें म्हटलें जातें. हा व्हेटोचा अधिकार अणुनियंत्रक समितीच्या कामकाजाला बंधनकारक राहाणार नाहीं, असा बरुक-योजनेचा मथितार्थ आहे. ही योजना मान्य झाली तर अमेरिकेचें हुकमी बहुमत असलेल्या समितीकडे, म्हणजेच अप्रत्यक्षपणें अमेरिकेच्या हवालीं सर्व देशांचे युरेनिअमचे सांठे आणि कारखाने दिल्यासारखें होईल, ही समिति रशियामधील अणुशक्तीच्या औद्योगिक उपयोगास हरकत घेऊन रशियाच्या अंतर्गत अर्थव्यवस्थेंत हस्तक्षेप करूं शकेल, आणि पाहणीच्या नांवाखालीं रशियाचा लष्करी नकाशा मिळवूं शकेल, असें स्पष्ट मत प्रो. ब्लॅकेट यांनीं व्यक्त केलें आहे. आज सोव्हिएटचा लष्करी नकाशा त्याच्या प्रतिस्पर्ध्याजवळ नाहीं ही सोव्हिएटच्या लष्करी सामर्थ्याची एक महत्त्वाची बाब आहे. बरें इतकें करूनहि शेवटीं अमेरिकाधार्जिणी अणुनियंत्रकसमिति अमेरिकेमधील अणुबॉम्बची निर्मिति बंद करीलच आणि अणुबॉम्बचे सांठे नष्ट करीलच याचा काय भरंवसा ? कारण, या सर्व गोष्टी पायरीपायरीनें व्हावयाच्या आहेत, आणि अणुबॉम्बचा निकाल लावणें ही या योजनेंतील जवळजवळ अखेरची पायरी आहे. तेव्हां बरुक योजनेमुळें अणुशक्तीच्या क्षेत्रांत जगावर अमेरिकेचें वर्चस्व लादलें जाईल, ही गोष्ट प्रो. ब्लॅकेट यांनीं उत्तम रीतीनें उघडकीस आणली आहे.

बड्या पांच राष्ट्रांचें ऐकमत्य हा यूनोच्या कार्यपद्धतीचा पाया आहे. अणुबॉम्बच्या शोधामुळें या " व्हेटो "च्या तत्त्वांत बदल करण्यासारखी परिस्थिति निर्माण झाली आहे काय ? असा प्रश्न प्रो. ब्लॅकेट यांनीं उपस्थित करून त्याचें उत्तरहि दिलें आहे. अणुबॉम्ब हें निर्णायक शस्त्र नाहीं, यूनोला पोलिसी







कारवाईनें वठणीवर आणतां येणें शक्य नाहीं. अशा परिस्थितींत ऐकमत्याचें तत्त्व सोडून दिलें तर हुकमी बहुमताच्या जोरावर लादलेल्या युद्धाला यूनोची "कायदेशीर मान्यता" देण्यास सवड मिळेल असा स्पष्ट इषारा त्यांनीं दिला आहे. म्हणूनच अणुशक्तीसारख्या महत्त्वाच्या क्षेत्रांत ऐकमत्याचें तत्त्व सोडून साध्या बहुमतानें निर्णय घेण्याचा आग्रह धरणें म्हणजे यूनो-संघटनेचा पायाच उखडण्याचा प्रयत्न करण्यासारखें आहे ही गोष्ट प्रो. ब्लॅकेट यांनीं वाचकांच्या निदर्शनास आणली आहे. अणुसमितीवर अमेरिकेला हुकमी बहुमत मिळण्याची खात्री नसती तर ती "व्हेटो"-चा अधिकार काढून टाकण्यास तयार झाली असती काय? असा खोंचक प्रश्न त्यांनीं विचारला आहे.

अणुशक्तीच्या नियंत्रणाची योजना आज सर्वमान्य होऊन यशस्वीपणें अंमलांत यावयाची तर हें ऐकमत्याचें तत्त्व कायम ठेवावें, अणुसमितीकडे खाणी-कारखान्यांच्या मालकीचे सर्वंकष अधिकार न देतां फक्त देखरेखीचे अधिकार द्यावेत, अणुबॉम्ब व इतर मनुष्यसंहारक शस्त्रांसंबंधीं साकल्यानें विचार करण्यांत यावा, आणि औद्योगिक उपयोगासाठीं अणुशक्तींचा विकास करण्यास भरपूर वाव मिळावा, असें प्रो. ब्लॅकेट यांनीं सुचविलें आहे.

## अमेरिकेचें अणुबॉम्बविषयक धोरण

अमेरिकेनें जपानवर प्रथम अणुबॉम्ब टाकतांना जें धोरण स्वीकारलें तें धोरणच अणुशक्तीच्या नियंत्रणाची कोणतीहि योजना सर्वमान्य होण्यास फारसें पोषक नव्हतें. तशांत अमेरिकेंतील सत्ताधारी वर्गांपैकीं एका प्रमुख गटाला हें नियंत्रण नकोच होतें. केवळ जागतिक दडपणामुळें त्यांना नियंत्रणाचें तत्त्व मान्य करावें लागलें; म्हणूनच अमेरिकेनें बरुक-योजनेसारखी दिसायला सोज्वळ दिसणारी पण वस्तुतः अमेरिकेचें वर्चस्व लादणारी योजना पुढें आणली असावी. अशी योजना सोव्हिएटला मान्य होण्याचा बिलकूल संभव नव्हता असें स्पष्ट दिसत असूनहि त्यांनीं या योजनेवर आग्रह धरला आणि सोव्हिएटनें ती अमान्य केल्यावर सोव्हिएट रशियाच अणुबॉंबच्या नियंत्रणाच्या आड येतो असा जगभर डांगोरा पिटण्यांत आला. या सर्व बनावाचा निर्देश करून प्रो. ब्लॅकेट यांनीं या अमेरिकन धोरणाचा अन्वयार्थ लावला आहे. अमेरिकेनें "कम्युनिझमला पायबंद" घालण्याच्या निमित्तानें जें आक्रमक धोरण स्वीकारलें आहे, त्या राजकारणी 'थंड्या युद्धा'चाच हा अणुक्षेत्रांतील भाग आहे असें ते म्हणतात. तसें नसतें तर अणुबॉंब हें निर्णायक शस्त्र आहे, त्यामुळें अल्पावधींत आणि फारशी हानि न होतां युद्ध जिंकतां येईल, रशियाकडे अणुबॉम्ब असते तर त्यांनीं अमेरिकेवर ते फेंकून अमेरिकेन शहरें कधींच बेचिराख केलीं असतीं इत्यादि धादांत असत्य प्रचाराचा आणि "चिथावणीवजा बाष्कळ बडबडीचा" अवलंब करण्याचें त्यांना मुळींच कारण नव्हतें, असें स्पष्ट मत प्रो. ब्लॅकेट यानीं व्यक्त केलें आहे.

सोव्हिएट रशियाच्या धोरणामुळेंच अणुशक्तीचें नियंत्रण होणें दूरापास्त झालें असून जगावर अणुयुद्धाचें भयानक संकट ओढवण्याचा संभव आहे असें जगाला भासवावें, हा अमेरिकन मुत्सद्द्यांचा डाव बरुक-योजनेमुळें कांहीं अंशीं साध्य झाला या गोष्टीचा प्रो. ब्लॅकेट उल्लेख केला आहे. कारण बरुक-योजना नाकारण्यांत रशियानें चूक केली, आडमुठेपणा दाखविला, यामुळें खुद्द रशियाचेंच नुकसान होणार आहे असा कित्येक प्रामाणिक शास्त्रज्ञांचा व इतरेजनांचा समज झाला. या सर्व आक्रोशाचें समालोचन करतांना, "अमेरिकेप्रमाणें रशियानें अणुबॉम्बचा घसका घेतलेला नाहीं हा रशियाचा केवढातरी अक्षम्य अपराध आहे, अशीच जणूं या लोकांची समजूत झालेली दिसते," असे अर्थपूर्ण औपरोधिक उद्गार प्रो. ब्लॅकेट यांनीं काढले आहेत. बरुक-योजना अमान्य झाल्यावर आंतरराष्ट्रीय राजकीय परिस्थिति बिघडली ही गोष्ट खरी; पण ती योजना यदाकदाचित् जर मान्य झाली असती तर ती आधिकच चिघळली असती असें बजावून प्रो. ब्लॅकेट यांनीं बरुक-योजनेविषयींच्या विवेचनाचा समारोप केला आहे.





अनुक्रमणिका

## मनुष्यसंहारक शस्त्रसाधनें

अणुशक्तीचें नियंत्रण करावयाचें, अणुबॉम्बवर बंदी घालावयाची तर तो प्रश्न रासायनिक विषारी वायु, निरनिराळीं रोगजंतूंचीं विषें, इत्यादी मनुष्यसंहारक साधनांवर बंदी घालण्याच्या प्रश्नाहून अलग करतां यावयाचा नाहीं असें प्रो. ब्लॅकेट यांनीं म्हटलें आहे. अणुबॉम्बसारखीं अस्त्रें हीं मुख्यतः नागरी जनतेच्या संहाराचीं साधनें आहेत ही गोष्ट त्यांनीं स्पष्ट केली आहे.

नागरी संहाराच्या बाबतींत कोणत्या राष्ट्रांचें धोरण कशा प्रकारचें आहे याविषयींहि त्यांच्या लिखाणांत अनेक महत्त्वाचे उल्लेख सांपडतात. स्वतांला अत्यंत भूतदयावादी, मानवतावादी व सुसंस्कृत समजणाऱ्या ब्रिटन-अमेरिकेंतलि सत्ताधाऱ्यांनींच शत्रुराष्ट्रांवर भयानक विमानहल्ले चढवून नागरी जीवन उध्वस्त करण्यास प्रथम सुरुवात केली. जर्मन शहरांवरील बॉम्बस्फोट व टोकियोवरील भयंकर धाड यांचें उद्दिष्ट लष्करी नसून मुख्यतः नागरी संहाराचेंच होतें. जर्मनी शरण येणार हें उघड दिसत असूनहि प्रागजवळील सुप्रसिद्ध स्कोडा कारखाना सोव्हिएट-व्याप्त प्रदेशांत जाईल, केवळ एवढयाच कारणास्तव अमेरिकन विमानांनीं तो कारखाना व शहर उध्वस्त केलें. जपानी शहरांवर अणुगोल टाकून भीषण मनुष्यसंहार करण्यामागें कोणतें राजकारण होतें याचा निर्देश मागें आलाच आहे. या शहरांवर हल्ले होतलि अशी पूर्वसूचना सुद्धां दिलेली नव्हती ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. या सर्व घटना ध्यानांत घेतल्या, अणुगोल हें कोणत्याहि राष्ट्राला नमविण्याचें निर्णायक साधन आहे हा अमेरिकन दहशती प्रचार पाहिला, आणि भावी महायुद्धांत नागरी संहारावरच मुख्य भर असेल हा अमेरिकन रणपंडितांचा युद्धविषयक दृष्टिकोन लक्षांत आणला कीं नागरी संहारासाठीं अमेरिका अणुगोल व इतर मनुष्यसंहारक अस्त्रें रशियन शहरांवर वापरणार नाहीं असें म्हणवत नाहीं, असें मत प्रो. ब्लॅकेट यांनीं प्रदर्शित केलें आहे.

उलट, सोव्हिएट रशिया मात्र अणुबॉम्ब अथवा इतर साधनें नागरी संहारासाठीं वापरणार नाहीं असा विश्वास त्यांना वाटतो. कारण गेल्या युद्धांत विमानहल्ल्यांनीं अथवा अन्य साधनांनीं लाल सेनेनें नागरी संहाराचें धोरण कधींच अवलंबिलें नाहीं. तसेंच कोणतेंहि युद्धसाधन—मग तें कितीहि संहारक असो—तें निर्णायक साधन असूं शकत नाहीं, युद्ध जिंकण्यासाठीं सर्व शस्त्रास्त्रांचा मेळ घालून उपयोग करावा लागतो असें सोव्हिएट रणपंडितांचें म्हणणें आहे. नागरी संहारसाधनांवर बंदी असावी असा त्यांचा आग्रह आहे. सोव्हिएटला शत्रुराष्ट्रांतलि जनतेची सहानुभूति मोलाची वाटणार हें अगदीं उघड आहे. या सर्वांचा उल्लेख करून प्रो. ब्लॅकेट यांनीं अमेरिकन शहरांवर सोव्हिएट अणुहल्ले होतील या अमेरिकेन मिथ्याप्रचाराचा भोंपळा एका लहानशा वाक्यानें फोडला आहे. ते म्हणतात, " सोव्हिएट रशिया असें करील असें समजण्यास एकहि कारण आढळत नाहीं. "

## तिसऱ्या महायुद्धाचा धोका

वरील सर्व गोष्टी ध्यानांत घेतां तिसऱ्या महायुद्धाचा ताबडतोबीनें धोका आहे असें प्रो. ब्लॅकेट यांना वाटत नाहीं. कारण सोव्हिएट रशिया आपण होऊन युद्ध करील असें त्यांस बिलकूल वाटत नाहीं. अमेरिकन गोटांत अणुबॉम्ब हें युद्ध जिंकण्याचें निर्णायक साधन आहे यावर भर देण्यांत येतो, आणि रशियन शहरांवर आतांच अणुगोलांचा अग्निवर्षाव करून रशियाला नेस्तनाबूद करावें अशा मनोरथी वल्गना कित्येक मंडळी करीत आहेत, ही गोष्ट खरी. पण या दहशतबाजीच्या धोरणाचा मुख्य उद्देश कोणता याविषयींचा प्रो. ब्लॅकेट यांचा निष्कर्ष वर सांगितलाच आहे. प्रत्यक्षांत अमेरिकन सत्ताधारी असें धाडस सध्यां तरी करतील असें त्यांना वाटत नाहीं. कारण असा अतिप्रसंग अमेरिकेनें केला तर तें युद्ध दीर्घ काळ चालेल, आणि त्यांत युरोप व आशिया खंडाचा बहुतेक भाग ओढला जाऊन तेथें भीषण यादवी युद्ध सुरू होईल.

रशियावर अणुहल्ले केले तर हे प्रश्न ताबडतोब उभे राहतील या गोष्टीकडे कानाडोळा करणारे " मंचकाधिष्ठित रणपंडित " अनेक आहेत, याची प्रो. ब्लॅकेट यांना पूर्ण जाणीव आहे; आणि या





अनुक्रमणिका

"रणपंडितां"च्या मेळाव्यांत कांहीं अणुशास्त्रज्ञहि आहेत हें त्यांना माहीत आहे. "या अणुशास्त्रज्ञांनीं अणुशास्त्राकडे जरा कमी लक्ष पुरवून बुद्धिबळें खेळण्यांची अधिक तसदी घ्यावी" असा सल्ला प्रो. ब्लॅकेट यांनीं या "रणपंडित" शास्त्रज्ञांना दिला आहे!

पाश्चात्य युरोपांतील देश रशियाविरुद्ध युद्धांत अणुबॉंब फेकण्याचे तळ म्हणून वापरण्यांत यावे असें अमेरिकन लष्करी तज्ज्ञ उघडपणें बोलून दाखवितात. रशियाभोंवतीं अमेरिका बळकावीत असलेले लष्करी तळांचे प्रदेश म्हणजे 'बुद्धिबळाच्या पटावर राजाच्यापुढें असलेल्या प्याद्याप्रमाणें' आहेत अशी भाषा ते बोलत असतात. या विचारसरणीचा समाचार घेतांना प्रो. ब्लॅकेट म्हणतात:—"लष्करी दृष्ट्या हा सर्व बिनतोड युक्तिवाद आहे हें खरें! पण ब्रिटन, फ्रान्स, स्कॅंडिनेव्हिया हे देश अमेरिकन राज्याचें संरक्षण करणारीं प्यादीं होण्याचें नाकारतील त्याची वाट काय?"

अणुशक्तीच्या नियंत्रणाविषयीं आणि अणुबॉम्बवर बंदी घालण्याविषयीं जागतिक राजकारण पुढें कोणतें स्वरूप घेईल याविषयीं प्रो. ब्लॅकेट यांनीं केलेलें विवेचन अगदीं तोकडें आहे. तसेंच हा प्रश्न कसा सुटेल यासंबंधींहि त्यांनीं फारसें विवेचन केलेलें नाहीं. अणुनियंत्रक समितीकडे कोणते अधिकार असावेत, तिची कार्यपद्धति कशी असावी बड्या राष्ट्रांच्या ऐकमत्याचें तत्त्व अबाधित कां राहिलें पाहिजे, यासंबंधींचीं त्यांचीं मतें बरुक-योजनेच्या विवेचनांत स्पष्ट झालीं आहेत. पण सध्यांच्या पेंचप्रसंगांतून मार्ग कोणता याचें विवेचन त्यांनीं फारसें केलेलें नाहीं. "आज माझ्या देशबांधवांना रुचेल अशी उपाययोजना सुचविणें मला शक्य झालें नाहीं" अशा अर्थाच्या प्रस्तावनेंतील वाक्यावरून प्रो. ब्लॅकेट यांना याची जाणीव असावी असें दिसतें.

## प्रो. ब्लॅकेट यांच्या विवेचनांतील उणीवा

इतर अनेक दृष्टींनीं प्रो. ब्लॅकेट यांचें विवेचन बहुमोल असलें तरी त्यांत एक मोठेंच वैगुण्य आहे असें म्हणणें भाग आहे. या सर्व प्रश्नाचा विचार करतांना त्यांनीं समाजशास्त्रीय आणि आर्थिक दृष्टिकोनांतून बिलकूल पाहिलेलें नाहीं. हा दृष्टिकोन नसल्यामुळें पुस्तकांतील विवेचन अपुरें व एकांगी झालें आहे आणि कांहीं बाबतींत सदोषहि झालें आहे. अमेरिकेनें रशियाशीं युद्ध पुकारलें तर युरोपांत "संघर्ष" निर्माण होतील, "यादवी" सुरू होईल असें त्यांनीं म्हटलें असलें तरीपण या सामाजिक संघर्षाचीं कारणें कोणतीं याची दखल त्यांनीं घेतलेली नाहीं. तसेंच अमेरिकेच्या आक्रमक धोरणावर त्यांनीं प्रकाश टाकला असला, आणि सोव्हिएट रशियाचें धोरण युद्धाचें नाहीं हें नमूद केलें असलें तरी अमेरिकेचें धोरण आक्रमक कां आणि सोव्हिएटचें धोरण शांततावादी कां याचा खुलासा ते करीत नाहींत. साम्राज्यवादी अर्थव्यवस्थेच्या पेंचप्रसंगांतून मार्ग काढण्यासाठीं अमेरिकन मक्तेदार युद्धाची व आक्रमणाची भाषा बोलत आहेत. याच मक्तेदारांच्या हातीं अमेरिकेच्या परराष्ट्रीय धोरणाचीं सूत्रें आहेत आणि म्हणून ते अणुबॉम्बसारख्या मनुष्यसंहारक अस्त्रावर बंदी घालण्यास तयार नाहींत. उलट सोव्हिएट राज्यपद्धति समाजवादी असल्यानें त्यांना आक्रमक राजकारणाची बिलकुल जरूरी नाहीं आणि म्हणून त्यांचा भर अणुशक्तीच्या औद्योगिक उपयोगावर आहे. भांडवलदारी व समाजवादी अर्थव्यवस्थेमधील हा मूलभूत विरोध आणि अमेरिकन मक्तेदारांचें आजचें आक्रमक धोरण हीं स्पष्टपणें विशद केलीं नाहींत तर आजच्या राजकारणांतील कोणत्याहि प्रश्नांची नीट संगति लागूं शकत नाहीं. अणुशक्तीच्या नियंत्रणासारख्या महत्त्वाच्या प्रश्नाची तर मुळींच लागणार नाहीं. तीच गोष्ट अणुशक्तीच्या शांतताकालीन उपयोगासंबंधीं. अणुशक्तीपासून यंत्रशक्ति निर्माण करण्याच्या आड अमेरिकेंतील मक्तेदार येण्याचा संभव आहे असें प्रो. ब्लॅकेट यांनीं सूचित केलें आहे हें खरें; पण अणुशक्तीपासून यंत्रशक्ति निर्माण करणें ही गोष्ट अमेरिकेच्या दृष्टीनें महत्त्वाची नाहीं, हें प्रो. ब्लॅकेट यांचें विधान विवाद्य आहे. वर सांगितलेल्या दृष्टिकोनाच्या अभावामुळेंच त्यांना "पुढें काय?" या प्रश्नांतून वाचकांना योग्य मार्गदर्शन

करतां आलेलें नाहीं. पण हे दोष जमेस धरूनहि प्रो. ब्लॅकेट यांचें विवेचन अत्यंत महत्त्वाचें आणि अणुशक्तीच्या प्रश्नावर उत्तम प्रकाश पाडणारें आहे यांत शंका नाहीं.

प्रो. ब्लॅकेट हे कम्युनिस्ट नाहींत, किंवा मार्क्सवादी आहेत असेंहि दिसत नाहीं- त्यांनीं वास्तववादी व चिकित्सक अशा शास्त्रीय दृष्टिकोनांतून या प्रश्नाकडे पाहिलें आणि खऱ्या भौतिक शास्त्रज्ञाला साजेशी प्रामाणिक भूमिका ठेवली; म्हणूनच साम्राज्यवाद्यांच्या धोरणाचें खरें स्वरूप (त्यांच्या विशिष्ट तऱ्हेनें) त्यांना दिसून आलें. प्रो. ब्लॅकेट यांचे कित्येक निष्कर्ष सोव्हिएट रशियाच्या अणुशक्तिविषयक धोरणाशीं जुळते आहेत याचें कारणहि हेंच आहे.

## पुस्तकानें उडविलेली खळबळ

प्रो. ब्लॅकेट यांचें पुस्तक प्रसिद्ध होतांच पुरोगामी विचारसरणीच्या सर्व लोकांनीं त्याचें स्वागत केलें. उलट प्रतिगामी साम्राज्यवादी गोटांचा त्यामुळें विलक्षण चडफडाट झाला. प्रो. ब्लॅकेट हे ज्या ब्रिटिश सल्लागार-समितीचे सदस्य होते त्याच समितीचे अध्यक्ष सर जॉन अँडरसन यांनीं रेडियोवरून प्रो. ब्लॅकेट यांजवर आग पाखडण्यास सुरुवात केली. पहिल्या महायुद्धापूर्वी आयरिश स्वातंत्र्याच्या चळवळीवर "ब्लॅक अँड टॅन" या नांवानें संबोधलेली भीषण दडपशाही करण्याबद्दल आणि बंगालचे हुकूमशहा गव्हर्नर म्हणून कुविख्यात असलेले अँडरसन ते हेच गृहस्थ. त्यांच्या सुरांत इतर प्रतिगामी "विचारवंतांनीं" व मुत्सद्द्यांनीं आपला आवाज मिळविला. अमेरिकेंतहि प्रतिकूल गोटांतून ब्लॅकेट यांचेवर जोराचा हल्ला चढविण्यांत आला. आपल्या कडील एक लहानशी घटनासुद्धां मोठी अर्थपूर्ण आहे. 'टाइम्स ऑफ् इंडिया' या पूर्वीच्या साम्राज्यवादी वृत्तपत्राचें 'संडे न्यूज' नांवाचें एक भावंड निघतें. त्यांत या पुस्तकांतील उतारे क्रमशः देण्यांत आले, आणि हें आम्हांस पूर्वी कोणी कां सांगितलें नाहीं अशा भूमिकेवरून प्रो. ब्लॅकेट यांना सामान्यतः पुष्टि देणारा संपादकीय लेखहि प्रसिद्ध झाला. पण लवकरच संपादकांना आपली "चूक" कळून आली असावी; कारण आपल्या "चुकीचें" परिमार्जन करण्यासाठीं प्रो. ब्लॅकेट यांजवर प्रतिकूल टीकेची आघाडी त्याच वृत्तपत्रांत उघडण्यांत आली !

असें हें गाजलेलें पुस्तक आहे; अणुशक्तीच्या नियंत्रणाविषयीं शास्त्रीय दृष्टिकोन समजून घेण्यासाठीं अतिशय उपयुक्त आहे. आज अणुबॉम्बचा प्रश्न पुन्हा एकदां जगापुढें आला आहे. अशा वेळीं इंग्रजी जाणणाऱ्या वाचकांनीं हें पुस्तक जरूर वाचावें अशी शिफारस करून हा लांबलेला परिचय संपवितों.

---

## एका वाक्याचें काव्य : दोन ओळींचें महाभाष्य !

कै. महादेवभाईंच्या डायरीचा तिसरा भाग गुजरातींत नुकताच प्रसिद्ध झाला. त्यांत ता. २-१-३३ ची एक गोष्ट नमूद केलेली आहे. "गेल्या आठवड्यांत गोविंद राघवनें एक लहान कपटा लिहून पाठविला होता. त्यांत एका बिशपची गोष्ट होती. तो बिशप एका टेकडीवर चढत होता. त्याच वेळीं एक ७ वर्षांची मुलगी आपल्या २ वर्षांच्या भावाला खांद्यावर घेऊन चढत होती व धापा टाकीत होती. बिशप म्हणाला : "अग, हा मुलगा तर तुला फार जड जात असेल ?" मुलीनें उत्तर दिलें : "मुळींच जड नाहीं. तो माझा भाऊ आहे." यावर बापूंनीं गोविंद राघवला उत्तर लिहिलें : "तुझें प्रेमळ पत्र मिळालें. केवढा महान् विचार ! 'तो जड नाहीं, तो माझा भाऊ आहे.' जास्तींत जास्त जड वस्तु पिसासारखी हलकी बनते, जेव्हां प्रेम ती उचलून नेत असतें." मुलीचें एका वाक्याचें काव्य. बापूंचें दोन ओळींचें त्यावर महाभाष्य !

—श्री. ना. ग. जोशी





अनुक्रमणिका

श्री. वि. न. बरवे

# श्री. अमृतलाल विठ्ठलदास ठक्कर ऊर्फ ठक्करबाप्पा

न त्वहं कामये राज्यं, न स्वर्गं नापुनर्भवम् ।
कामये दुःखतप्तानां, प्राणिनां आर्तिनाशनम् ॥

( नको राज्य, नको स्वर्ग, मला तो मोक्षही नको ।
मला दुःखार्त जीवांचें—हवें दुःखनिवारण ॥ )

सृष्टीची योजना भौतिक अथवा मानवी जगांत अगदीं समान पातळी ठेवण्याची दिसत नाहीं. पृथ्वीचा पृष्ठभाग पहा : त्यावर कांहीं खोल दऱ्या आहेत, कांहीं लहानमोठीं मैदानें आहेत, कांहीं टेकड्या व डोंगर आहेत. व कांहीं उत्तुंग पर्वत आहेत ! या उत्तुंग पर्वतराजीवरील पाणी नद्यांच्या रूपानें खालील मैदानांत येऊन त्यांना सुपीक व समृद्ध बनवितें.

आणि हीच गोष्ट मानवी जीवनांत आहे. प्रत्येक समाजांत बहुसंख्य लोक हे सामान्य बुद्धिमत्तेचे व सामान्य नीतिमत्तेचे असतात. पण त्यांतूनच कांहीं लोक प्रचंड बुद्धिशाली आणि नैतिक व आध्यात्मिक उंचीवर भरारी मारणारे निघतात. सामान्य लोक कमींत कमी काम करूं इच्छिणारे असतात, तर कांहीं थोर व्यक्ती अतिशय शारीरिक, मानसिक व आध्यात्मिक धडपड करणारे असून त्यांच्या ठिकाणीं प्रचंड इच्छाशक्ति व कार्यशक्ति असते. बहुतेक लोक खाजगी प्रपंचांत गुंतलेले असतात, तर कांहीं थोडे लोक प्रपंचांत न पडतां, अथवा प्रपंचाकडे दुर्लक्ष करून अथवा प्रपंच सोडूनहि सार्वजनिक सेवेला वाहून घेतात. त्यांची कार्यशक्ति आणि बौद्धिक व आध्यात्मिक कमाई समाजाच्या, राष्ट्राच्या व मनुष्यजातीच्या सेवेला विश्वव्यापी प्रेमभावनेनें अर्पण केली जाते. असे थोर पुरुष हेच समाजाच्या व राष्ट्राच्या उत्कर्षाचे आधार व मनुष्यजातीच्या प्रगतीचें आशास्थान आहेत. मनुष्यजातीच्या ठिकाणीं असलेली सुप्तशक्ति अशा थोर पुरुषांच्या रूपानें वेळोवेळीं प्रकट होत असते, व सर्व समाजाची पातळी वर उचलते.

अशा श्रेष्ठ पुरुषांत पूज्य ठक्करबाप्पा यांची गणना होते. त्यांच्या वयाला नुकतींच ता. २९ नोव्हेंबर १९४९ रोजीं ८० वर्षे पूर्ण झालीं. त्या निमित्तानें त्यांचें ओझरतें दर्शन 'नवभारत'च्या वाचकांना देण्याचा अल्प प्रयत्न या ठिकाणीं मी करीत आहे.

ठक्करबाप्पा यांचा जन्म ता. २९ नोव्हेंबर, सन १८६९ रोजीं काठेवाडांत—आतां सौराष्ट्र—भावनगर येथें झाला. त्यांच्या घरची परिस्थिति सामान्यतः गरीबीची होती. वडील विठ्ठलदास हे फार कष्टाळु, टापटिपीनें राहणारे व शिस्तपालन करणारे होते. ठक्कर,





अनुक्रमणिका

बाप्पा यांच्या ठिकाणीं आज जी टापटीप, शिस्त, व्यावहारिक चोखपणा, बारकाईचा अभ्यास व श्रमशक्ति दिसते, ते गुण त्यांनीं आपल्या वाडिलांपासून उचललेले आहेत, असें म्हणावयास हरकत नाहीं. ते वाडिलांना आपले पाहिले गुरू समजत. त्यांचें प्राथमिक शिक्षण व हायस्कूलचें शिक्षण भावनगर येथें पुरें झालें. वाडिलांची इच्छा आपल्या मुलानें काठेवाडमधील एकाद्या संस्थानांत दिवाण व्हावें अशी होती. पण अर्थात् भवितव्य वेगळें होतें. मॅट्रिक झाल्यावर युवक अमृतलाल हे पुण्याच्या एंजिनियरिंग कॉलेजमध्यें शिक्षणासाठीं दाखल झाले व १८९० सालीं एल्. सी. ई. परीक्षा पास झाले.

यानंतर अमृतलाल ठक्कर यांनीं बार्शी लाइट् रेल्वे, बी. जी. आय. पी. रेल्वे (काठेवाड), नंतर १८९९ ते १९०२ पावेतों पूर्व आफ्रिकेंत युगांडा रेल्वे व सन १९०४–५ सालांत सांगली–संस्थान या ठिकाणीं एंजिनियर व नंतर १९०५ ते १९१४ पावेतों मुंबई शहरांत म्युनिसिपल रोड एंजिनियर म्हणून त्यांनीं नोकरी बजाविली. अमृतलाल यांचेवर धाकट्या बंधूंच्या शिक्षणाची जबाबदारी होती.

## सेवेसाठीं अधीर

दरम्यान त्यांच्यावर अनेक कौटुंबिक आपत्ती आल्या. सन १९०६ सालीं प्रथम पत्नीचा मृत्यु, वाडिलांच्या आग्रहावरून १९०८ सालीं द्वितीय विवाह, पण द्वितीय पत्नीचाहि १९१० सालीं मृत्यु व १९१३ सालीं वाडिलांचा मृत्यु असे प्रसंग घडले. या पूर्वींच्या चार वर्षांत दलित-सेवेला वाहिलेले कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे, भारत-सेवक श्री. गोपाळराव देवधर व स्त्रीशिक्षणाचे महर्षि प्रा. धोंडो केशव कर्वे यांच्याशीं व त्यांनीं चालविलेल्या कार्याशीं एंजिनिअर ठक्कर यांचा संबंध आला आणि यापुढील आयुष्य कौटुंबिक सेवाकार्यांत आणि पैसा मिळविण्यांत न घालवितां जनसेवेकडे वळवावें असें त्यांच्या मनानें कित्येक वर्षांपासून घेतलें.

पण पक्का निश्चय करण्यापूर्वी १९१३ सालीं त्यांचे धाकटे बंधु डॉ. केशवलाल ठक्कर यांच्याशीं त्यांनीं विचारविनिमय केला. बंधू म्हणाले, "आणखी पांच वर्षांनीं तुमच्या मुंबई म्युनिसिपालिटींतील नोकरीला १५ वर्षे पुरीं होतील व तुम्हांला ½ पेन्शन मिळूं शकेल. नंतर तुम्हांला हवा तितका वेळ सेवाकार्याला देतां येईल." परंतु अमृतलाल हे बंधूंना म्हणाले–"पांच वर्षें! पांच वर्षांत केवढें तरीं काम होईल? आणि पांच वर्षें जगेन, हें तरी कोणी सांगावें? संकल्प केल्यानंतर सात वर्षेंपावेतों मी धीर धरला; कारण वडिलांच्या मनाला दुखवावयाचें नव्हतें. आतां पितृश्री दिवंगत झाले. पांच वर्षें आतां गमवावयाचीं नाहींत!" तेच आजचे ८० वर्षांचे पू. ठक्करबाप्पा होत.

मुंबई म्युनिसिपालिटीचा राजीनामा अगोदर देऊन भारतसेवक समाजाचे सदस्य होण्यापूर्वी अमृतलाल ठक्कर यांनीं आपल्या छोट्यामोठ्या भावांना जें पत्र लिहिलें, त्याला आज ऐतिहासिक महत्त्व आहे. तें पत्र येणेंप्रमाणें :

मुंबई, ता. २५–१–१९१४

"प्रिय बंधूंनो,

"हें पत्र लिहितांना मला वाईट वाटतें; कारण यांतील मजकुरानें तुम्हां सर्वांना दुःख होईल. हा समाचार तुम्हांला कळविण्याचें काम कोणा मित्राच्या वांट्याला गेलें असतें, तर बरें झालें असतें. पण अखेर हें कटु कर्तव्य मलाच बजावलें पाहिजे.

"मुंबई म्युनिसिपालिटीच्या नोकरीचा राजीनामा मी दिला आहे आणि येत्या दोन तारखेला मी नोकरींतून मुक्त होऊन भारतसेवकसमाजाला मिळेन. मी या संबंधांत कोणाचा सल्ला घेतला नाहीं. मी फक्त माझ्या अंतर्नादाच्या सल्ल्याप्रमाणेंच –माझ्या अंतरात्म्याच्या आज्ञेप्रमाणेंच–हें पाऊल टाकलें आहे. यांत कदाचित् मी चूक करीत असेन. पण चूक असली तर ती माझ्या अंतरांतील हांकेची चूक असेल. कांहीं होवो, या हांकेची या पुढें मी अवगणना करूं शकत नाहीं.

"मी नोकरींत असतांना माझ्या हाताखालील माणसांशीं माझे अपार प्रेमसंबंध जुळले आहेत. एवढेंच नव्हे, बिचारे निर्जीव रस्ते, त्यांचेबरोबरहि मी प्रेमाच्या बंधनानें बांधला गेलों आहे. माझ्या आप्तजनांपेक्षां माझीं हीं माणसें आणि हे रस्ते यांचा वियोग घडतांना मला विशेष दुःख








होतें. माझ्या हाताखालचा अंमलदार काल मला म्हणाला त्याप्रमाणें, मी जणूं शेकडों नोकर आणि हजारों मजूर यांचा कांहीं अपराध करुन राहिलों आहे, असें मला भासतें. माझ्यावर ममतेचा वर्षाव करणारीं आणि मला नेहमीं गोड दुवा देणारीं, अशीं हजारों माणसें–त्यांना जणूं रडवून मी चाललों आहे, असेंहि मला वाटतें. कोणी म्हणतात, नोकरी करीत असतांना माझा दर्जा आणि प्रतिष्ठा यांच्या आधारानें जें मी सेवाकार्य करूं शकलों तें मी नोकरी सोडल्यावर मुळींच करूं शकणार नाहीं !

"असें हें सर्व असलें, तरीं मी श्रद्धेनें मानीत आलों आहे कीं हिंदुस्थानाला आपलें संपूर्ण जीवन अर्पण करणाऱ्या सेवकांची खास जरूर आहे; केवळ फुरसत आणि सवड सांपडेल तेव्हां काम करणारांची नव्हे. आणि जोंपर्यंत आजीव कार्यकर्ते हिंदुस्थानाला मिळत नाहींत, तोंपर्यंत देशाची खरी प्रगति होणार नाहीं. खरें काम करणाराला पैसा कमी पडत नाहीं. गोखलेजींसारख्यांच्या चरणापाशीं हजारों आणि लाखों रुपयांचा ढीग पडतो, पण त्यांना खरें काम करणारे सेवक मिळत नाहींत. व म्हणून हा ध्यास धरतांना जर मी कांहीं चूक करीत असेन, तर ती चूक मी शुभ संकल्प धारण करून आणि प्रामाणिकपणें करीत आहे.

"तुमचें माझ्याकडे कांहीं घेणें असेल, तर तें वेळेवर कळवा. कारण, मी आतां सर्वांचा हिशेब चुकता करूं इच्छीत आहे. आणि यानंतर ज्या संस्था किंवा व्यक्ती यांच्याकडून द्रव्य घेऊन सेवा करण्याचें काम मला लाभलें होतें, तें आजपासून संपलें, हें तर न सांगतांही कळेल.

"माझ्या अंतर्व्यथेचा आतां शेवट होत आहे. जीवनांतील सर्व वियोग दुःखकर आहेत: पण मी तुम्हां सर्वांना उत्कृष्ट सेवाकार्यासाठीं सोडून जात आहे आणि मी असें मानतों कीं तुम्हां सर्वांचे मला शुभ आशीर्वाद आहेत.

तुमचा बंधु

**अमृतलाल.**"

वरील पत्रांत ठक्करबाप्पांच्या जीवनाची गुरुकिल्ली सांपडते यांत शंका नाहीं. ती गुरुकिल्ली म्हणजे, केवळ हाताखालच्या माणसावर नव्हे तर ज्या ठिकाणीं आपण श्रम केले, त्या दगडमातीच्या रस्त्यावरसुद्धां प्रेम करणारी विश्वप्रेमी वृत्ति होय. या पत्राला आज पस्तीस वर्षें झालीं. पण त्यांतील एकएक अक्षर आजहि तितकेंच खरें आहे. आपलें संपूर्ण जीवन समाजाच्या, राष्ट्राच्या वा मानवजातीच्या सेवेला अर्पण करणारे किती लोक आहेत ? रोजच्या जीवनक्रमांत ठक्करबाप्पा एक क्षणहि फुकट घालवीत नाहींत. अत्यंत आवश्यक तेवढीच दुपारची विश्रांति आणि रात्रींची झोंप घेऊन, बाकीचा सर्व वेळ ते कामाला लावतात. खाजगी द्रव्यसंचय तर नाहींच, परंतु ते घेत असलेलें अल्प मानधन आणि निरनिराळ्या समित्यांवर काम करतांना मिळणारे भत्ते, यांतून शक्य तेवढी बचत करून बाकी उरणारा सर्व पैसा ते भारतसेवकसमाजाकडे पाठवून देतात. सन १९१४ सालीं अमृतलाल ठक्कर हे भारतसेवकसमाजाचे सभासद झाले.

### कामें तर वाटच पहात होतीं !

सन १९१४ सालापासून १९२२ सालापावेतों ठक्करबाप्पा यांनीं स्वतंत्र कार्याची उभारणी केलेली दिसत नाहीं; परंतु भारत–सेवक–समाजाचें काम त्यांची वाटच पहात होतें. कामावर रुजू झाल्याबरोबर, ते युक्त–प्रांतांत दुष्काळनिवारणाच्या कामावर रवाना झाले. सन १९१५ सालीं मुंबईच्या भंगी–लोकांच्या सहकारी संस्थांवर देखरेख; अहमदाबाद आणि मुंबई येथील मजूरवर्गाच्या मुलांसाठीं अनेक शाळा काढणें; सन १९१६ सालीं कच्छमधील दुष्काळनिवारणाचें काम; सन १९१७ सालीं त्या वेळच्या मुंबई कौन्सिलच्या बिनअधिकारी सभासदांच्या संस्थेचे सेक्रेटरी होऊन अनेक विषयांचा सखोल अभ्यास आणि श्री. विठ्ठलभाई पटेल यांनीं मुंबई प्रांतासाठीं जें मोफत व सक्तीच्या प्राथमिक शिक्षणाचें बिल आणलें होतें, त्यासाठीं माहिती मिळवण्याचें काम; हीं सर्व कामें त्यांनीं मेहनत घेऊन केलीं. त्यासाठीं ठक्करबाप्पा अक्षरशः वणवण फिरले. रात्र नाहीं, पहांट नाहीं, गुजरातमधील गांवोगांव धुंडाळून शाळांतलि मुलांची





अनुक्रमणिका

माहिती मिळविली. सन १९१८ सालीं जमशेटपूर (आतां टाटानगर) येथील मजूरवर्गांत काम आणि संघटना, सन १९२० सालीं ओरिसा प्रांताच्या पुरी जिल्ह्यांत दुष्काळनिवारण, सन १९२१ सालीं काठेवाडांत खादीकार्य व सन १९२२ सालीं पंचमहाल जिल्ह्यांत दुष्काळनिवारणकार्य याप्रमाणें व यापेक्षांहि अधिक प्रमाणांत यापुढील सर्व वर्षें इतक्या निरनिराळ्या महत्त्वाच्या कामांनीं खच्च भरलीं आहेत, कीं त्यांची यादी फार मोठी होईल !

## आदिवासी कार्याची मुहूर्तमेढ

सन १९२२ सालीं पंचमहाल जिल्ह्यांत दुष्काळनिवारणाचें काम करीत असतांना, ठक्करबाप्पा यांच्या लक्षांत ही गोष्ट आली कीं, मदतीचें तात्पुरतें काम ठीकच आहे. परंतु भिल्ल व दुबळे यांच्या उन्नतीसाठीं कायम स्वरूपाचें विधायक कार्य उभारण्याची आवश्यकता आहे. म्हणून त्यांनीं दोहद येथें कांहीं मित्रांच्या साहाय्यानें 'भिल्ल-सेवा-मंडळ' या नांवाची संस्था स्थापन करून ती वाढीला लावली. हिंदुस्थानांत हिंदी लोकांतर्फे आदिवासी सेवाकार्याचा हा प्रारंभच होय. यापूर्वीं मिशनरी लोकांनीं आदिवासी व हरिजन यांचेसाठीं कांहीं शाळा व दवाखाने चालविले होते. पण त्यांच्या सर्व सेवाकार्यांत धर्मांतराची दृष्टि असल्यामुळें, त्यांच्या कार्याविषयीं लोकांना संशय वाटत असे आणि वाद निर्माण होत. परंतु केवळ मिशनऱ्यांवर आणि ख्रिस्ती धर्मावर हल्ले चढविण्याऐवजीं आपल्या देशांतील मागासलेला वर्ग (हरिजन, आदिवासी व इतर मागासलेले) यांच्या उन्नतीसाठीं आपण स्वतः सेवाकार्य उभारूं अशी इच्छा मात्र फारशी कोणाला झाली नव्हती. ठक्करबाप्पा यांनीं सन १९२२ पासून १९३२ सालापावेतों, इतर अनेक कामें करीत असतांनाहि, गुजरातचें भिल्लसेवामंडळ वाढीला लावलें व त्याच्या कामाचा खूप विस्तार केला. १९३२ सालीं म. गांधी यांच्या आदेशानुसार अ. भा. हरिजनसेवकसंघाचे प्रधानमंत्री या नात्यानें नवी जबाबदारी ठक्करबाप्पा यांच्या शिरावर आली व दिल्ली येथें रहाणें आवश्यक झाल्यानें भि. से. मंडळाची जबाबदारी श्री. डाह्याभाई नायक व श्री. लक्ष्मीदास श्रीकांत यांचेवर त्यांनीं सोंपविली व तीं ते दोघे चांगल्या प्रकारें पार पाडीत आहेत. आज-मितीस दोहद तालुका व झालोद महाल या भागांत आदिवासी वर्गाच्या मुलांमुलींसाठीं चार आश्रम चालू आहेत. शंभरांपेक्षां अधिक को-ऑपरेटिव्ह पतपेढ्या व विविध कार्योकरितां सोसायट्या काढल्या असून, कच्च्या व पक्क्या मिळून सुमारें १५०० विहिरी बांधण्याला मंडळानें मदत केली आहे. या भिल्ल भागांत आज जिकडेतिकडे गहूं-हर-भऱ्याचीं हिरवींगार शेतें दिसून येतात. मंडळानें भिल्ल—समाजांतून सुमारें ५० कार्यकर्ते तयार केले असून ते मंडळातर्फे चालू असलेले आश्रम, स्वयं-स्फूर्त शाळा व सहकारी सोसायट्या यांचीं कामें जबाबदारीनें करीत आहेत व श्री. डाह्याभाई नायक हे त्यांना मार्गदर्शन करीत आहेत. आदिवासी सेवाकार्याचें हें रोपटें वाढीस लागल्यानंतर इतर अनेक ठिकाणीं आदिवासी सेवेसाठीं संस्था सुरू झाल्या. जवळच्या सुरत जिल्ह्यांत वेडची आश्रमांत श्री. जुगतरामभाई दवे हे वीस वर्षांपासून ठाण मांडून बसले आहेत व त्या भागांतील दुबळ्या लोकांची सेवा करीत आहेत. दारूबंदी, शेतीसुधारणा, खादीद्वारा वस्त्र-स्वावलंबन इत्यादी कार्यें चालू आहेत. महाराष्ट्रांत पश्चिम खानदेश जिल्ह्यांत भिल्लसेवामंडळ व भिल्ल-सुधार-समिति, नाशिक जिल्ह्यांत डांगसेवामंडळ, ठाणें जिल्ह्यांत आदिवासीसेवा—मंडळ, इत्यादी संस्था गेल्या दहा वर्षांपासून काम करीत आहेत. मध्यप्रांत, बिहार, ओरिसा, आसाम, मलबार इत्यादी दूरदूरच्या प्रांतांतून आदिवासी—सेवा—कार्य संघटितरूपानें सुरूं झालें आहे. या सर्व कार्याला ठक्करबाप्पा यांचा सल्ला वा प्रोत्साहन वा मार्ग-दर्शन यांचा लाभ झालेला आहे व आदिवासी सेवाकार्याचें जाळें देशभर निर्माण करण्याचें मुख्य श्रेय ठक्करबाप्पा यांनाच आहे. या निरनिराळ्या संस्थांचें संघकिरण करण्याची आकांक्षा ठक्करबाप्पा यांच्या मनांत कैक वर्षांपासून घोळत होती. ती गुदस्त सालीं सफल झाली व भारतीय आदिम-जाति-





अनुक्रमणिका

# श्री. अमृतलाल विठ्ठलदास ठक्कर ऊर्फ ठक्करबाप्पा

सेवकसंघ ही संस्था डॉ. राजेंद्रप्रसाद यांचे अध्यक्षतेखालीं ठक्करबाप्पा यांनीं निर्माण केली. बहुतेक आदिवासी सेवा-संस्था या संघाला जोडल्या आहेत. या संस्थेचें कार्यालयहि दिल्ली येथेंच ह. से. संघाच्या कार्यालयाच्या एका भागांत चालू आहे. अशा रीतीनें आदिवासी-सेवा-कार्याचा एक प्रचंड वटवृक्ष ठक्करबाप्पा यांनीं वाढविला आहे. आदिवासी कार्याची स्फूर्ति त्यांची स्वतःची आहे व या कार्यावरील त्यांचें प्रेम आणि ओढा अखंड आहे. त्यासाठीं त्यांनीं हिंदुस्थानभर अनेक दौरे केले. आसामसारख्या दूरस्थ व दुर्गम प्रदेशांत ठक्करबाप्पांनीं सुमारें दहा फेऱ्या केल्या. मलबार-पासून काश्मीरपर्यंत व कराचीपासून शिलाँगपर्यंत एकहि अवघड वन्य प्रदेश पहावयाचा त्यांनीं शिल्लक ठेवला नाहीं. त्यांच्याइतका सार्वजनिक कामासाठीं देशभर फिरलेला दुसरा कोणी पुरुष आज हयात नाहीं.

## हरिजनकार्य

हरिजनकार्यांत ठक्करबाप्पा आपण होऊन पडले असते असें वाटत नाहीं. कारण आदिवासी कार्य व संकटनिवारणाचें कार्य यांचा व्याप कांहीं थोडा नव्हता. परंतु सन १९३२ सालीं पूर्वा-स्पृश्यांचे पुढारी व इतर हिंदूंचे पुढारी यांचे दरम्यान जो पुणें-करार झाला तो घडवून आणण्यांत ठक्करबाप्पा यांनीं खूप मेहनत घेतली. खानेसुमारीचे हरिजनविषयक सर्व आंकडे व माहिती आणि कायदे-कौंसिलांतील समासदांची संख्या याविषयीं सर्व माहिती ठक्करबाप्पा यांनींच मेहनत करून पुरविली. या पुणें-करारांतून अस्पृश्यतानिवारण लवकर घडवून आणण्याची जी जबाबदारी हिंदु समाजावर पडली व जी पार पाडण्यासाठीं अ. भा. अस्पृश्यतानिवारक संघ (म्ह. हरिजन-सेवक-संघ) स्थापन करण्यांत आला, त्याचें प्रधान मंत्रिपद म. गांधी यांच्या सांगण्यावरून ठक्करबाप्पांनीं पत्करिलें व त्यांच्या नेहमींच्या चिकाटीच्या पद्धतीनें त्यांनीं हिंदुस्थानच्या सर्व काँग्रेसविभागांत प्रांतिक संघशाखा व तद्द्वारां जिल्हाशाखा वगैरे काढविल्या आणि देशभर हरिजनकार्याला चालना दिली. त्यासाठीं म. गांधी, संघाध्यक्ष घनश्यामदास बिर्ला, उपाध्यक्षा श्रीमती रामेश्वरी नेहरू यांचेबरोबर व स्वतंत्रपणेंहि हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांत त्यांनीं अनेक वेळां दौरे काढले, फंड जमविले, चोख हिशेब ठेवून सालोसाल अहवाल प्रसिद्ध केले आणि विधायक स्वरूपाच्या हरिजनकार्याचें मार्गदर्शन केलें. दुर्दैवानें, आदिवासी कार्याप्रमाणें हरिजनकार्याचा प्रवाह संथपणें चालला नाहीं. त्याला राजकारणाची बाधा झाल्यामुळें त्यांत सुरुवाती-पासून खळबळ झाली. गांधीजी व डॉ. आंबेडकर हे दोन शक्तिप्रवाह जवळ आले, पुन्हां दूर झाले. या घटनेचा दोष ठक्करबाप्पा यांचेकडे नाहीं. त्यांनीं आपल्यापरी चिकाटीनें परिश्रम केले व करीत आहेत. हरिजनसमाजाला स्वतःचे पुढारी लाभले, आदिवासी समाजांत मात्र अद्यापि कोणी मोठा पुढारी निघाला नाहीं. पण ठक्करबाप्पा यांनीं ही वाण भरून काढली व अगदीं वरपर्यंत हा प्रश्न त्यांनीं नेऊन भिडविला आहे. हरिजनांप्रमाणेंच आदिवासी-नाहि कांहीं काळ खास संरक्षण मिळणार आहे.

## कमिट्यांवरील कामें

ठक्करबाप्पा यांनीं सर्व प्रांतांतील आदिवासी कार्य करणाऱ्या व हरिजन कार्य करणाऱ्या अनेक संस्था व कार्यकर्ते यांच्यांशीं संबंध ठेवला व त्यांना मदत केली. ठक्करबाप्पा हे या सर्व माहितीचे व अनुभ-वांचे चालतेबोलते कोश आहेत. निरनिराळ्या प्रांतिक सरकारांना त्यांची मदत घेणें आवश्यकच झालें. म्हणून मुंबई, मध्यप्रांत, बिहार-ओरिसा, आसाम इत्यादी प्रां. सरकारांनीं त्यांना आदिवासी व हरिजन यांच्या उन्नतीबाबत योजना करण्यासाठीं वेळोवेळीं अनेक समित्यांवर नेमलें व अध्यक्षहि केलें. खुद्द मुंबई-प्रांतांत मि. स्टार्ट, आय. सी. एस., डॉ. आंबेडकर व ठक्करबाप्पा यांची स्टार्ट-कमिटी सन १९२९ सालीं सरकारनें नेमली होती. तिनें हरिजन व आदिवासी यांच्या प्रश्नांचा अभ्यास करून जो रिपोर्ट केला, त्या अन्वयें मुंबई सरकारचें बॅकवर्ड-क्लास खातें, बॅकवर्डक्लास ऑफिसर, प्रांतिक बॅकवर्ड-क्लास-व जिल्हा बॅकवर्ड-क्लास-कामिट्या, हा सर्व





अनुक्रमणिका

कार्यविस्तार निर्माण झाला. या खात्यातर्फे मोठ्या प्रमाणावर लाखों रुपयांची मदत प्रांतांतील सर्व मागासलेल्या वर्गांच्या लोकांना मिळत आहे. कॉंग्रेस सरकारनें पांच वर्षांत अंशतः वगळलेल्या भागांतील आदिवासी जनतेसाठीं वसि लाख रुपये खर्च करण्याचें ठरविलें होतें, त्या अन्वयें जी मॅक्गॉन कमिटी मुंबई सरकारनें नेमली होती, तिचेहि ठक्करबाप्पा सदस्य होते.

हिंदुस्थान सरकारनेंहि ठक्करबाप्पा यांना अनेक कमिट्यांवर नेमलें आहे. बॅकवर्ड क्लासेस स्कॉलरशिप बोर्ड, हरिजन निर्वासितांसाठीं रिलीफ व रिहॅबिलिटेशन खात्याचा विभाग, हरिजन निर्वासितांना कर्ज मंजूर करणाऱ्या अर्थखात्याचा विभाग, इत्यादि अनेक कामें त्यांचेवर सोंपविलीं आहेत. एवढ्यानेंच झालें नाहीं, तर कस्तुरबा स्मारकनिधि, गांधी-स्मारकनिधि वगैरे अनेक संस्थांचीं कामें या उतार वयांत ठक्करबाप्पा यांचेवर सोंपविण्यांत आलीं आहेत. इतक्या कामांचा प्रचंड व्याप ते कसा सांभाळतात, हें त्यांचें कार्य जवळून पाहिल्याखेरीज त्याची बरोबर कल्पना येणार नाहीं.

## इतर क्षेत्रांतील कामगिरी

ठक्करबाप्पा इतर सार्वजनिक कार्यांपासून अगदींच अलिप्त राहिले असें मात्र नाहीं. व राजकारणाचा स्पर्श झाल्यानें ते भ्यालेहि नाहींत. बोरसद येथील स्त्रियांच्या करुण कहाणीची चौकशी, अ. भा. संस्थानी प्रजापरिषदेचें मंत्रिपद व प्रांतिक अध्यक्षपद, काठेवाड मधील राजकीय परिषदेचें अध्यक्षपद, इतकेंच नव्हे, तर सुरत जिल्ह्यांतील मद्यपानाचें पिकेटिंग इत्यादी अनेक चळवळींशीं त्यांनीं संबंध ठेवला, पिकेटिंगला प्रोत्साहन दिल्याबद्दल त्यांचेवर खटला झाला. त्यांत त्यांनीं स्वतःचा बचाव करण्याचें नाकारलें व त्यांना सहा महिन्यांची सजा झाली. दोन महिन्यांनीं सरकारनें त्यांना सोडून दिलें, ही गोष्ट वेगळी. १९३२ सालींहि त्या वेळच्या सरकारनें त्यांना अटकेंत ठेवलें होतें. १९४६-४७ सालांत म. गांधी यांचे बरोबर पूर्व बंगालच्या नौखाली विभागांत ते चार महिने फिरले. अशा रीतीनें त्यांनी जरी राजकीय चळवळीची खास जबाबदारी आपल्या अंगावर घेतली नाहीं, तरी वेळ येईल तेव्हां त्यांनीं ती मुद्दाम टाळलीहि नाहीं. त्यांची चोहोंकडे बारीक नजर असते. हैद्राबादच्या बीदर जिल्ह्यांत १९४८ अखेरच्या कांहीं महिन्यांत हरिजनांचीं जीं सामुदायिक धर्मांतरें झालीं तीं कशामुळें झालीं याचा त्यांनीं महाराष्ट्र प्रांतिक ह. से. संघातर्फे तपास करविला व बीदर जिल्ह्यांत ह. से. संघाची जिल्हा शाखा गेल्या जुलै महिन्यांत स्थापन करविली.

## बापू व बाप्पा

हिंदुस्थानांत बापू एकच झाले व बाप्पाहि एकच आहेत; बापू व बाप्पा या शब्दांचा अर्थ एकच आहे हे शब्द स्वतःच्या वडिलांबद्दल आदरानें वापरले जातात. गांधीजींना बापू व ठक्करबाप्पांना बाप्पा हे शब्द लोकांनींच स्वयंस्फूर्तीनें आदरपूर्वक लावण्यास गेल्या वीस वर्षांत सुरुवात केली. या दोघांत बरेंच साधर्म्यहि आहे. दोघेहि काठेवाडांत जन्मले. दोघांचेंहि वय जवळजवळ सारखेंच होतें. बापूंपेक्षां बाप्पा अवघे दोन महिन्यांनीं लहान. दोघांनींहि आद्य 'भारत-सेवक' गोपाळ कृष्ण गोखले यांना गुरुस्थानीं मानलें. गांधीजी हे सार्वजनिक कार्यांत बरेंच अगोदर ओढले गेले. ठक्करबाप्पा हे कौटुंबिक पाशांत बरींच वर्षें राहिल्यानें, मागाहून त्यांत स्वतःच्या ओढीनें पडले. पण तळमळ, सत्यप्रीति, संयम, शिस्तपालन, व्यावहारिक चोखपणा, काटकसर, अखंड देशव्यापी कामाचा उरक या सर्व बाबतींत त्यांचें साम्य आहे. गांधीजी यांची वृत्ति लढाऊ असल्या मुळें देशाच्या राजकीय जीवनांत ते ओढले गेले. व त्यांना सर्व जगांत प्रसिद्धि मिळाली. पंचवीस वर्षें हिंदुस्थानच्या राजकारणाचीं सूत्रें त्यांनीं हलविलीं. ठक्करबाप्पांचें कार्यक्षेत्र वेगळें होतें. त्यांनीं गांधीजींइतकें लिहिलें नाहीं व ते इतकें बोलले नाहींत. पण जें लिहिलें तें वेंचक व माहितीपूर्ण लिहिलें. त्यांची कार्यमग्नता व कार्याची उच्च बैठक गांधीजींप्रमाणेंच आहे.

बापू व बाप्पा यांची भेट १९१५ सालीं गांधीजी हिंदुस्थानांत परत आले त्यावेळीं प्रथम झाली. त्यापूर्वींच ठक्करबाप्पा भारत-सेवक-समाजाचे

[illegible] झाले होते. अर्थात् त्यांची स्फूर्ति स्वतंत्र होती. ज्याप्रमाणें महाराष्ट्रांत तीनशें वर्षांपूर्वी शिवाजीमहाराज व श्रीसमर्थ रामदास या दोन कार्यशक्ती स्वतंत्रपणें जन्मल्या व नंतर त्यांचा संगम झाला, त्याचप्रमाणें बापू व बाप्पा या दोन कार्यशक्तींचा उगम स्वतंत्रपणें होऊन त्यांचा संगम मागाहून झाला. बापू हे हरिजनकार्याचे मुख्य संचालक तर बाप्पा हे आदिवासी कार्याचे मुख्य संचालक. हीं दोन्हीं कामें एकमेकांना पूरक आहेत व यामुळें मागसलेल्या वर्गाचा प्रश्न बहुतेक सुटण्याच्या मार्गास लागला आहे.

" ठक्करबाप्पा यांनीं ज्याप्रमाणें एकसूत्रीपणानें अखंड सेवाकार्य केलें, त्याप्रमाणें स्वतःला करता यावें, अशी माझी आकांक्षा आहे. "...
" ठक्करबाप्पा यांच्यासारखा कार्यकर्ता विरळा. त्यांना पुढें येण्याची इच्छा नाहीं, स्तुति मुळींच नको. त्यांचें काम हेंच त्यांचें समाधान; आणि तीच त्यांची करमणूक. त्यांच्या उत्साहावर वयाचा परिणाम झालेला नाहीं. ते एक संस्था बनले आहेत. " हे त्यांच्याविषयींचे गांधीजींचे उद्गार आहेत. यापेक्षां अधिक वर्णन काय करावें !

## काम हीच प्रार्थना

बाप्पांचे जीवन हे एक चालतें बोलतें घड्याळ आहे. दिल्ली येथे असतांना त्यांचें काम अगदीं [illegible]पणें चालतें. अजूनहि लवकर उठून, स्नान वगैरे आटोपून, सकाळीं ८ वाजतां ते ह. से. संघाच्या कार्यालयांत जातात व दुपारीं १२ वाजेतों काम करितात. भोजन अगदीं साधें. तिखट खात नाहींत; एवढाच काय तो नियम. पं. नेहरूंनीं तांदूळ वाचविला पाहिजे हें म्हटल्यापासून, बाप्पांनीं भात खाण्याचें सोडून दिलें आहे! भोजनोत्तर कांहीं वेळ विश्रांति घेऊन, तीन वाजतां पुन्हां ऑफिसमध्यें हजर होतात व सहा वाजेपावतों काम करितात. काम शिल्लक राहिलें तर कांहीं वेळ त्यासाठीं रात्रहि देतात. सकाळीं ऑफिसांत जाण्यापूर्वी दैनिक वृत्तपत्रें वाचून घेतात. रात्रीं हल्लीं जेवीत नाहींत. फक्त दूध अगर कॉफी व बरोबर एखादें फळ असल्यास घेतात. नंतर दिवसभरांत झालेला ऑफिसचा जमाखर्च एका कारकुनानें पुरा करून आणलेला वाचून दाखवावयाचा. त्यांतील बारीक-सारीक तपशील समजून घ्यावयाचा. ह. से. संघाच्या आवारांत कांहीं बांधकाम चालू असेल तर त्यावर किती माणसें होतीं, त्यांनीं काय काम केलें, याचा रिपोर्ट घ्यावयाचा; नंतर पूर्वी रोज-निशी स्वतः लिहित, आतां ती लिहवून घेतात. नंतर एखाद्या ग्रंथाचें कांहीं वाचन व गीतेचा एक अध्याय वाचून घेणें व स्वतः म्हणणें; याप्रमाणें कार्यक्रम झाल्यावर रात्रीं १० चे सुमारास झोप-तात. ऑफिसमध्यें ह. से. संघ, आदिमजाति-सेवकसंघ इत्यादी निरनिराळीं कामें व त्यासाठीं निरनिराळीं माणसें आहेत. प्रत्येकानें त्याबाबत आलेलीं पत्रें बाप्पांकडे घेऊन जावयाचीं, तीं त्यांना वाचून दाखवावयाचीं व त्यांचीं उत्तरें लिहून घ्यावयाचीं; असा केवढा तरी मोठा पत्रव्यवहार बाप्पा दररोज पाहून उरकतात. अनेक लहानमोठे कार्यकर्ते रोज भेटावयास येतात. त्यांच्याजवळ विचारपूस करतात. आतां तर सौराष्ट्राचे प्रतिनिधि म्हणून घटनासमितीवरहि त्यांची निवड झाली आहे व त्या कामांतहि ते नियमानें भाग घेतात. त्यांच्या ऑफिसांतील तरुण लोक थकून जातात, पण बाप्पा थकत नाहींत. इतकें सुसूत्र रेखीव काम करणारा व करून घेणारा दुसरा पुरुष माझ्या पहाण्यांत नाहीं. हरिजन-उद्योग-शाळेच्या विद्यार्थ्यांची रोज रात्रीं प्रार्थना होते. तेथें ठक्करबाप्पा कधीं कधीं हजर राहातात. त्यांचें काम हीच त्यांची प्रार्थना आहे. दिल्लींत असले म्हणजें शुक्रवारीं सायंकाळीं राजघाटावर प्रार्थनेसाठीं जाण्याला मात्र ते चुकत नाहींत. ठक्करबाप्पांची गेल्या ३० वर्षांची रोजनिशी ही माहितीची खाण, आदिवासी कार्य व हरिजनकार्य यांच्या इतिहासाचें मोठें साधन व राष्ट्राची एक मौल्यवान् ठेव आहे.

## ' जो पीड पराई जाणे रे '

परिमित आहारविहारामुळें बाप्पांची शरीर-प्रकृति सहसा कधीं बिघडत नसे. पण वाढतें वय आपला परिणाम हळू हळू करीतच रहातें. त्यांची

नजर फार कमी झाली आहे व पार्थिव हृदययंत्र कांहींसें दुर्बळ झालें आहे. शरीराला कृशता आली आहे पण बाप्पांना जास्त जगण्यासाठीं काम सोडावयाचें नाहीं. कार्यकर्त्यांची कामांत कसूर झाली, तर त्यांची कानउघाडणी करण्याला ते कमी करीत नाहींत. पण हृदय कनवाळू आहे. आल्या-गेल्याचें जेवणखाण व त्याचें काम यांची आस्थेनें ते चौकशी करतात. जुन्या जुन्या ओळखी काढून मित्रांच्या व कार्यकर्त्यांच्या मुलाबाळांची प्रेमानें चौकशी करतात आणि एखादे वेळीं विनोदहि करितात. पण तो किती निर्दोष!

ज्याला सत्ता आणि कीर्ति यांचा लोभ कधीं शिवला नाहीं, भारताची सेवा हा ज्याचा निदिध्यास, दलितांचें व पीडितांचें दुःखनिवारण हें ज्याचें वेड, शिस्त हा ज्याचा स्वभाव, कार्य हीं ज्याची प्रार्थना, अशा या थोर पुरुषाला या पुढेंहि चांगलें आरोग्य लाभावें व आणखी अनेक वर्षें त्यांचें मार्गदर्शन भारतांतील समाजसेवकांना लाभावें, यांखेरीज दुसरी कोणती इच्छा व प्रार्थना हिंदुस्थानांतील प्रत्येक सहृदय जाणता माणूस बाप्पांच्या जयंतीच्या निमित्तानें करील ?

## हिंदुस्थानांतील घरांचा प्रश्न

ज्यांत साधारणपणें किमान लागणारी हवा, प्रकाश, जागा आहे, म्हणून ज्यांना 'घर' म्हणतां येईल अशीं घरें हिंदुस्थानांत जेमतेम शेंकडा ४ लोकांच्या वांट्याला येत असतील! मुंबईसारख्या ठिकाणीं शेंकडा १० लोक उघड्या पायवाटेच्या फरशीवर राहातात. मुंबईतील शेंकडा ७० घरें हीं एका खोलीचीं असून, त्या एका खोलींत रहाणाऱ्या माणसांचें सरासरी प्रमाण १० पडतें.—मुंबई इलाख्यांतील उद्योगधंद्यांचीं केंद्रें अशीं जीं चारपांच मोठीं शहरें आहेत त्यांना एकंदर अंदाजें ४ लक्ष घरें लागतील; त्यांपैकीं १ लक्ष २५ हजार घरें १९५२ सालापर्यंत बांधून पुरीं करावयाची मुंबईसरकारनें योजना केली होती. त्यांपैकीं प्रत्यक्ष सरकारनें स्वतः बांधायची योजलेली अशीं १५००० असून बाकीचीं स्थानिक नगरपालिका, गिरण्यांचे मालक आणि सहकारी संस्था यांनीं बांधायचीं असें ठरलें होतें. या योजनेपैकीं प्रत्यक्ष कृतींत किती उतरली हें बघितलें असतां असें दिसतें कीं एप्रिल १९४७ ते जुलै १९४९ पर्यंत केवळ ३५७० घरें बांधलीं गेलीं असून त्यांपैकीं शेंकडा ४० हीं दुरुस्त केलेलीं जुनीं लष्करी 'कँपटीं' आहेत!

मध्यवर्ती सरकारनें उद्योगधंद्यांचीं केंद्रें असलेल्या शहरांसाठीं लागणाऱ्या घरांकरितां ८७५ कोटी रुपयांची एक प्रचंड योजना आंखली आहे. त्या योजनेप्रमाणें मध्यवर्ती सरकार त्या रकमेपैकीं शेंकडा $\frac{2}{3}$ रक्कम कर्ज म्हणून देणार असून बाकीच्या $\frac{1}{3}$ ची व्यवस्था प्रांतिक सरकारानें करावयाची आहे. ही सर्व रक्कम शेवटीं गिरणी–मालकांपासून वसूल करावयाची असून, कामगारांकडून केवळ नेहमींच्या खर्चा (maintenance charges) करितां भाडें म्हणून घ्यावयाचें आहे. उ०, मुंबईला दोन खोल्या आणि एक स्वयंपाकघर असलेल्या एका घराला १०,००० रु. खर्च येणार असून, त्या गिरणीमालकानें दर वर्षी ३०० रु. त्या घरामागें द्यावयाचे; म्हणजे एकाद्या कारखान्यांत ८००० मजूर असले आणि त्यांपैकीं पैसे मिळविणाऱ्या दर दोन मजुरांना एक घर द्यावयाचें म्हटलें तर त्या कारखान्याला दर वर्षी १२ लाख रु. अव्याहत द्यावे लागतील. कारखानदारांना हें किती परवडेल याबद्दल शंकाच आहे. याशिवाय कामगाराला २१ रु. महिना भाडें द्यावें लागेल. हें इतकें भाडें देणेंही कामगाराला कसें शक्य होईल हाही प्रश्नच आहे.

या उलट कारखानदारांनीं अधिक वास्तववादी योजना सुचविलेली आहे. त्यांच्या मतें कामगारवर्गापैकीं अर्धे जे सडे रहातात त्यांच्याकरितां मोठमोठ्या हॉलवजा खोल्या (dormitories) बांधाव्या व राहिलेल्या अर्ध्यांना उपनगरांतून घरें बांधून द्यावीं. अर्थात् त्यांना कारखान्यापर्यंत 'ये–जा'ची (Transport) सोय करावी लागेल. त्याकरितां कारखानदारानें दर घरामागें २ रु. द्यावे. जर कांहीं काळानंतर योग्य अटींवर तीं घरें त्यांच्या मालकीचीं होत असलीं तर कांहीं कारखानदार तर याकरितां १/३ भांडवल द्यायला तयार आहेत.

—'**टाइम्स ऑफ इंडिया**' वरून सारांशरूपानें.

प्रा. देवदत्त अ. दाभोलकर

# आ ज चें ज ग

## ( जागतिक अर्थ-राज-कारणांचें समालोचन )

जागतिक अर्थराजकारणांचें अद्ययावत् समालोचन हीं आज अेक अवघड गोष्ट घेऊन बसली आहे. दररोज कांहींतरी अनपेक्षित, आकास्मिक घटना घडत आहेत. अर्थकारणांत सुबत्ता व राजकारणांत स्वस्थता हीं दोन्हींहि आज दुर्मिळ झालेलीं आहेत. जगातील सर्व राष्ट्रांतून अंतर्गत व आंतरराष्ट्रीय विरोध वाढीला लागले आहेत. अशा परिस्थितींत अर्थराजकारणांचें समालोचन ही गोष्ट अवघड तर खरीच परंतु तितकीच ती आवश्यकहि पण होऊन राहिलेली आहे. केवळ सुरक्षिततेच्या दृष्टीनेंहि आपण कोणीकडे चाललों आहोंत याचें यथार्थ ज्ञान जनतेला असणें आज आवश्यक व महत्त्वाचें आहे. केवळ या दृष्टीनेंच जागतिक घटनांच्या पाठीमागील महत्त्वाच्या सूत्रांचा उलगडा करण्याचा प्रयत्न या लेखांत करण्यांत येईल.

अमेरिकेची संपन्नता, राशियाचा समाजवाद, इंग्लंडची अगातिकता व बहुसंख्य राष्ट्रांचें अपार दारिद्र्य हीं आजच्या जागातिक अर्थराजकारणांमागील मुख्य आदिसूत्रें आहेत. अमेरिकेला कम्युनिझमूला पायबंद घालावयाचा आहे व आपलें आर्थिक वर्चस्व जगावर स्थापावयाचें आहे. राशियन छापाच्या कम्युनिझमूचा सार्वत्रिक प्रसार राशियाला करावयाचा आहे व आपलें अमेरिकाविरोधी राजकीय नेतृत्व इतर राष्ट्रांवर लादावयाचें आहे. आपली आर्थिक परिस्थिति व युद्धपूर्व राहाणीचें मान हीं कशीं सावरता येतील, व आपल्या लोकशाही समाजवादाच्या प्रयोगाला स्थैर्य व यश हीं कशीं लाभतील या विवंचनेंत इंग्लंड आहे. इंग्लंड व ब्रिटिश साम्राज्यांतर्गत सर्व राष्ट्रें यांचा कल निश्चितपणें अमेरिकेकडेच आहे ही गोष्ट आतां स्पष्ट झालेली आहे. यूरोप व आशियांतील इतर बहुतेक सर्व राष्ट्रें आज उपासमार व दारिद्र्य यांनीं गांजलेलीं आहेत. कम्युनिझम् हाच या दैन्यांतून बाहेर पडण्याचा मार्ग आहे अशी त्यांपैकीं अनेकांची खरी वा खोटी निश्चिति झाल्यासारखी दिसत आहे. आर्थिक स्वस्थतेसाठीं लोकशाही स्वातंत्र्याचें मूल्य देण्यास तीं तयार झाल्यासारखीं दिसतात. याच राष्ट्रांतून अमेरिका-राशिया यांच्या रस्सीखेंचींची केन्द्र-रेषा जाते. जर्मनी व जपान हीं दोनहि राष्ट्रें आज पूर्णपणें हतबल दिसत असलीं तरी या अनिश्चित परिस्थितींत तीं केव्हां व कुणाच्या बाजूनें सामर्थ्यशाली उठाव करतील तेंहि सांगता येण्यासारखें नाहीं.

### अमेरिकेची प्रचंड भांडवलनिर्मिति

कांहीं दिवसांपूर्वीं जगाच्या आर्थिक उत्पन्नाचे व निरानिराळ्या भूप्रदेशांना बाहेरून किती भांडवलाची गरज सामान्यपणें लागेल याबद्दलचे आंकडे प्रसिद्ध करण्यांत आले. जगाच्या एकूण आर्थिक

परिस्थितींची कल्पना या आंकडयांवरून येऊं शकेल. ते आंकडे खालीं[1] दिले आहेत.

जगाची आर्थिक संपत्ति आज कुठें आहे व ती कुठें पाहिजे आहे याची कल्पना त्या आंकड्यांवरून येऊं शकेल. भांडवल निर्माण करून तें गुंतविण्यासारख्या परिस्थितींत असलेलीं आज दोनच मुख्य राष्ट्रें आहेत. तीं म्हणजे अमेरिका ( U. S. A. ) व रशिया हीं होत. रशियांत एकूण वार्षिक उत्पन्नापैकीं शेंकडा २१ टक्के उत्पन्न हल्लीं भांडवलासाठीं बचत म्हणून बाजूला काढण्यांत येतें. अमेरिकेंत हच्चि बचत राष्ट्रीय उत्पन्नाच्या १६·४ टक्के या प्रमाणांत आहे. परंतु अमेरिकेचें एकूण उत्पन्न राशियाच्या पांचपटीनें अधिक असल्याकारणानें, अमेरिकेची भांडवलनिर्मितीची शक्ति रशियाहून कितीतरी अधिक राहते. रशियाला आपलें युद्धकालीन नुकसान भरून काढून आपली आर्थिक पुनर्रचना करावयाची आहे. चौथ्या पंचवार्षिक योजनेप्रमाणें ( १९४५-१९५० ) हें कार्य बहुतांशीं पुरेंहि होत आलें आहे. परंतु तरीहि रशियालाच अद्याप बाहेरून भांडवली मदत मिळाल्यास हवी आहे, ही गोष्ट कृषिसंघटनेनें दिलेल्या भांडवली गरजांच्या आंकडयांवरून स्पष्ट होतें. जगाला जरूर ती भांडवली मदत पुरेशा प्रमाणावर करण्यासारख्या स्थितींत आज एकच राष्ट्र आहे. तें म्हणजे अमेरिका हें होय.

अशा प्रचंड प्रमाणांत भांडवलनिर्मिति होत असतांना ती बाहेर गुंतविण्यासाठीं अमेरिका आतुर असावी ही गोष्ट साहजिक आहे. पहिल्या महायुद्धापूर्वीं आन्तरराष्ट्रीय भांडवल–गुंतवणीच्या व्यवहारांत अमेरिका हें एक ऋणको राष्ट्र होतें.

---

१ **वार्षिक उत्पन्नाचे आंकडे :** ( यूनोतर्फे गोळा झालेल्या माहितिवरून हे आंकडे घेतले असून ते रुपयाच्या नवीन भावाप्रमाणें कोटि रुपयांचे आहेत. )

| | उत्पन्न | लोकसंख्या ( कोटि ) |
|---|---|---|
| उत्तर अमेरिका ( संयुक्त संस्थानें व कॅनडा ) | १,२०,००० | १६ |
| रशियाखेरीजचा यूरोप | ९०,००० | ३२ |
| रशिया | २६,००० | २० |
| मध्य व दक्षिण अमेरिका | ८,८०० | १५ |
| आशिया | २९,००० | १२० |
| आफ्रिका | ७,५०० | १६ |
| आस्ट्रेलिया | ४,२००० | ७५ लक्ष |

**भांडवली गरजांचे आंकडे :** ( हे जागतिक अन्नधान्य व कृषिसंघटने( F. A. O. )नें गोळा केलेले आहेत. निरनिराळ्या प्रदेशांना पुढील चार वर्षांत एकूण किती कोटि रुपये किंमतीच्या भांडवली मदतीची अपेक्षा आहे हें या आंकड्यांवरून कळून येईल. )

| | |
|---|---|
| | ४४,८०० कोटि रुपये |
| पश्चिम व मध्य यूरोप | ४,३०० |
| दक्षिण यूरोप | ४,८०० |
| पूर्व यूरोप | ७,६०० |
| रशिया | २,९०० |
| आफ्रिका | ३,७०० |
| दक्षिण अमेरिका | ७६० |
| नजीक पूर्व | ४,८०० |
| आतिपूर्व | |





अनुक्रमणिका

पहिल्या युद्धाच्या काळांत तें मोठ्या प्रमाणावर धनको राष्ट्र बनलें व उत्तरोत्तर अमेरिकेची ही धनसत्ता वाढतच आहे. बहुतेक सर्व बाबतींत अमेरिका स्वयंपूर्ण आहे. त्यामुळें या दिलेल्या कर्जांची मूळ रक्कम किंवा व्याज हीं कोणत्या स्वरूपांत परत घ्यावींत हाहि अमेरिकेपुढें असलेला एक निरंतरचा बिकट प्रश्न आहे. परंतु सध्यांच्या अर्थव्यवस्थेंत अंतर्गत आर्थिक मंदी टळावी या दृष्टीनेंहि अशी भांडवलाची निर्यात चालू ठेवणें अमेरिकेला अपरिहार्य आहे. या भांडवलाच्या गुंतवणीसाठीं व या भांडवलाच्या गुंतवणींतूनच अमेरिकेचे आर्थिक पाश जगाभोंवती आवळले जात असतात.

भांडवलाची गुंतवण आज दोन मार्गांनीं करतां येते. एक, आंतरराष्ट्रीय बँकेमार्फत, किंवा स्वतंत्र रीतीनें. आन्तरराष्ट्रीय बँक कांहीं कर्जें स्वतः देते तर कांहीं कर्जांच्या बाबतींत आपली हमी देऊन तशीं कर्जें उभारणें सुलभ करून देते. यासाठीं अर्थातच प्रत्येक कर्जाच्या स्वरूपाची कसोशीनें पहाणी करण्यांत येते. भारताला कर्जें मिळण्यापूर्वी याच दृष्टीनें बँकेच्या तज्ज्ञांचें निरीक्षण-मंडळ येथें येऊन गेलें. या बँकेंतहि अर्थात् अमेरिकेचेंच वर्चस्व आहे. कारण संस्था कोणतीहि व कशीहि घडविली तरी गुंतविण्यासाठीं भांडवल आज फक्त एकट्या अमेरिकेकडेच आहे ही गोष्ट डावलतां येत नाहीं. अमेरिकन भांडवदार कोणत्या अटींवर व किती भांडवल गुंतवावयास तयार आहेत हाच आजचा मुख्य प्रश्न आहे. सध्यांच्या अनिश्चित राजकीय परिस्थितीमुळें आपलें भांडवल आशिया–यूरोप या खंडांत गुंतविण्यास अमेरिकन लोक कचरत आहेत. १९४८ मध्यें अमेरिकन भांडवलदारांनीं अमेरिकेंतच ३००० कोटी डॉलर्स भांडवल गुंतविलें. याच वर्षी परदेशीं केवळ १५० कोटी डॉलर्स अमेरिकन भांडवलदारांकडून खाजगी गुंतविण्यांत आले. यामुळें गुंतावितां न येणाऱ्या भांडवलाचें अजीर्ण अमेरिकेला सहन करावें लागतें. व त्या भांडवलाच्या साहाय्यानें जगाच्या अन्य भागांची जी प्रगति झाली असती तीहि मार्गे राहाते. अमेरिकन सरकारनेंच बाहेर गुंतविलेल्या भांडवलाच्या संरक्षणाची हमी देऊन अमेरिकन भांडवलदारांना भांडवल-निर्यातीला उत्तेजन द्यावें असे प्रयत्न प्रेसिडेंट ट्रूमन यांनीं अलीकडे सुरू केले आहेत. त्यांना कितपत यश येतें तें लवकरच कळेल.

## अर्थकारणाच्या पाठीशीं राजकारण

अमेरिकेच्या आर्थिक धोरणाचीच छाया आजच्या जागतिक अर्थकारणावर पडली आहे. त्या धोरणाचे पैलू असे : (१) अमेरिकेचें अंतर्गत उत्पादन असेंच चढतें ठेवून आर्थिक मंदी टाळण्याचा प्रयत्न. (२) पश्चिम यूरोपमधील राष्ट्रांना पुनर्घटनेसाठीं मार्शल–योजनेप्रमाणें मदत (३) इंग्लंडला मित्रराष्ट्र म्हणून सांभाळण्याचा यत्न, परंतु इंग्लंडच्या समाजवादी धोरणाला आळा बसावा अशी मनीषा. इंग्लंडच्या स्वास्थ्यासाठीं अमेरिकेनें निरंतर डॉलर–कर्ज इंग्लंडला देत राहावें हें धोरणहि अमेरिकेनें आतां सोडून दिलें आहे. आपल्या शक्तीवर आपलें युद्धपूर्व राहणीचें मान टिकवितां येत नसेल तर इंग्लंडनें आपलें राहणीचें मान खालीं आणावें या अमेरिकन विचारप्रणालीचा परिणाम म्हणजेच पौंडांची करावी लागलेली मूल्य-घट होय. (४) रशियन वर्चस्वाखालीं नसलेल्या आशियांतील इतर राष्ट्रांना आर्थिक मदतीनें आपल्या बाजूला ओढण्याचा प्रयत्न.

या सर्व अर्थकारणाच्या पाठीशीं आजचें राजकारण आहे. अमेरिकेला रशियाची भीति वाटते ती मुख्यत्वें दोन कारणांसाठीं : (१) अमेरिकेखेरीज अितर सर्व जगाचा भाग रशियन वर्चस्वाखालीं गेल्यास अमेरिकन भांडवलाची बाहेर गुंतवण असुरक्षित, किंबहुना अशक्य होईल. (२) कांहीं काळानंतर कम्युनिझमचें अमेरिकेवरील आक्रमण थोपवून धरणें ही गोष्टहि दुष्कर होऊन बसेल. तेव्हां कम्युनिझमच्या प्रसाराला पायबंद,याच एका धोरणानें अमेरिका आजचे अर्थ-कारणांतील व राजकारणांतील डाव टाकीत आहे.

कम्युनिझमच्या प्रसाराला आज आशिया व यूरोप या दोनहि खंडांतील भूमि पुष्कळशी तयार झालेली आहे. हलाखीच्या काळांत समाजवादाच्या दिशेनें उठावणी व्हावी यांत आश्चर्यकारक किंवा





अनुक्रमणिका

अनिष्ट असेंहि कांहींच नाहीं. परंतु रशीयाला अेका विशिष्ट पद्धतीचा व रशीयाचें राजकीय वर्चस्व राखणारा समाजवादच अितर राष्ट्रांत स्थापन व्हावयास हवा आहे. इंग्लंडचा समाजवादी प्रयत्न समाजवाद म्हणून रशीया ओळखत नाहीं. इंग्लंड-मधील लोकशाही समाजवादाचा प्रयोग हा अभिनव व महत्त्वाचा आहे असें म्हटल्याबद्दल प्रसिद्ध रशीयन अर्थशास्त्रज्ञ व्हर्गा याला आपल्या जागेला मुकावें लागलें. रशीयांतील नेहमींच्या पद्धतीप्रमाणें अलीकडे व्हर्गा यास सत्यज्ञान (!) झालें व इंग्लंडचा समाजवाद हा भांडवलदारांच्या फायद्यासाठीं राबविण्यांत येत असून त्याबाबत आपली दिशाभूल झाली होती अशी कबूली आतां त्यानें दिली ही गोष्ट वेगळी. युगोस्लाव्हियाच्या बाबतींतील रशीयन धोरणामुळें तर रशियाचा हा दुराग्रह अधिकच स्पष्ट झाला आहे. या कम्युनिस्ट मतप्रणालीच्या राष्ट्रावर, तें आपलें राजकीय वर्चस्व मान्य करीत नाहीं म्हणून, रशीयानें जो आकस धरला आहे तो रशीयन् विचार-सरणीचा पुरेपूर निदर्शक आहे.

रशियाचें सामर्थ्य आज वाढतें आहे ही गोष्ट मात्र खरी. पूर्व यूरोप तर रशीयाच्या ताब्यांतच आहे. पाश्चिम युरोपांत—मार्शलयोजनेप्रमाणें मदत मिळ-णाऱ्या या विभागांतहि—प्रबल कम्युनिस्ट पक्ष अस्तित्वांत आहेत. तिसरें महायुद्ध झालेंच तर ध्येय-निष्ठेच्या प्रखरतेनें हे पक्ष रशियाचा सक्रिय पाठ-पुरावा करतील व रशियाला युरोपवर आपलें वर्चस्व सहज स्थापन करतां येअील. स्ट्रासबुर्ग येथील अधि-वेशनांत योजलेली युरोपीय राष्ट्रांची समिति ( Council of Europe ) किंबहुना अॅटलांटिक कराराप्रमाणें आंखलेली संरक्षणाची योजना ही देखील आकस्मिक प्रत्यक्ष आक्रमणाच्या वेळीं अपुरी पडेल. परंतु मार्शल—मदत, अॅटलांटिक करारा-सारख्या योजना, पश्चिम जर्मनीची संघटना अशा उपायांवर युरोपमध्यें आपली भिस्त ठेवणें अमेरिकेस भाग आहे. अटलांटिक करारांत असलेलीं राष्ट्रें कोणाहि एकावर आक्रमण झाल्यास एकमेकांना मदत करावयास बांधलेलीं आहेत. अमेरिका ( U. S. A. ), कॅनडा, ग्रेट ब्रिटन, आयर्लंडमधील अल्स्टर, नॉर्वे, डेन्मार्क, हॉलंड, बेल्जम, फ्रान्स, पोर्तुगाल, व अिटली हीं राष्ट्रें प्रत्यक्ष करारांत आहेत. पाश्चिम जर्मनी व फ्रेंच वायव्य आफ्रिका यांचाहि सांकेतिक समावेश केलेला आहे. प्रत्यक्ष आक्रमणाला सुरुवात झालीच तर ती पाश्चिम जर्मनमिधूनच होईल ही गोष्ट अर्थातच उघड आहे. रशीयन विरोधाला न जुमानतां अमेरिकेच्या पाठबळावर आज युगोस्लाव्हिआची युनोच्या सुरक्षासमितीवर सभासद म्हणून निवड झाली आहे. युगोस्लाव्हिया अटलांटिक करारांतहि आपला समावेश कदाचित् करून घेईल व तसें झाल्यास तेथेंहि जागतिक युद्धाच्या आगीचा पहिला भडका होणें असंभवनीय नाहीं.

पाश्चिम जर्मनीविषयीं अमेरिकेला अगत्य वाटतें तें याच कारणानें. पाश्चिम जर्मनीविषयीं कोणतें धोरण आंखावें हा अमेरिकेला थोडा पेंचाचाच प्रश्न आहे. जर्मनीच्या महान् पुनरुत्थानाचा अनुभव ताजा आहे. जर्मन आक्रमणाचा प्रत्यक्ष अनुभव असलेलीं सर्व राष्ट्रें—विशेषतः फ्रान्स—जर्मनीला कोणत्याहि सवलती देण्याच्या विरुद्ध आहेत. जर्मनीचे महत्त्वाचे सर्व उद्योगधंदे खचीं करावेत असा त्यांचा आग्रह आहे. परंतु रशियाला सीमा-रेषे-वर विरोध म्हणून अमेरिकेला जर्मनीचें महत्त्व वाटतें. जर्मन उद्योगधंदे नष्ट केले तर यूरोपला मदत म्हणून अधिकच पैसा ओतावा लागणार हेंहि अमेरिकेला उघड दिसत आहे. कारण यूरोपच्या यांत्रिक उत्पादनापैकीं बहुतांश भाग जर्मनीकडूनच येत असे. आडेनोर याच्या नेतृत्वाखालीं जर्मनीचा कांहीं कारभार जर्मन विधिमंडळाच्या हातीं देऊन जर्मनीविषयींच्या उदार धोरणाला सुरुवात झालेली आहे. पाश्चिम जर्मनींत नाझी चळवळीचें पुनरु-त्थान व वाढती बेकारी हे दोन धोके आज स्पष्टपणें दिसत आहेत. ते अमेरिका कितपत टाळूं शकेल हें सांगतां येत नाहीं. नाझी चळवळ नेस्त-नाबूद करण्याचा प्रयत्न तर निश्चितपणें विफल झाल्यासारखा दिसतो. याउलट पूर्व जर्मनमिध्यें आपल्या वतीनें लोकसभा ( People's Congress ) स्थापून रशियानें कारभार सुरू केला आहे. जर्मनीचें यापुढील भवितव्य आंतरराष्ट्रीय परिस्थिती-वरच अवलंबून राहील.



अनुक्रमणिका

## आशीयांतील अशान्तता

आशियांतील सर्व राष्ट्रांत आज अशांतता दिसते. कम्युनिस्ट क्रान्तींचा आशियांतील वेग वाढत आहे. उत्तर चीन निखालसपणें कम्युनिस्टांच्या हातांतून गेला आहे. अमेरिकेनें भरपूर मदत केली नाहीं तर दाक्षिण चीनहि लवकरच कम्युनिस्टांच्या ताब्यांत जाईल. अमेरिका चीनमध्यें अधिक हस्तक्षेप करील असें आज वाटत नाहीं. पोळले तेवढे हात पुरें झालें असें म्हणून काढता पाय घ्यावा हेंच अमेरिकेचें धोरण दिसतें. एक जाडजूड श्वेतपत्रिका प्रसिद्ध करून आपल्या चीनमधील अपयशांचें खापर अमेरिकेनें चिनी पुढाऱ्यांच्या नालायकपणावर फोडलें आहे. चीनचा कम्युनिस्ट पुढारी माओ–त्से–तुंग हा दुसरा रशियाविरोधी टिटो ठरेल अशी आशा बाळगावी व आपले पोळलेले हात शक्य तर त्याच्याशीं हस्तांदोलनासाठीं पुढें करावेत हेंच या परिस्थितींत अमेरिकेला शक्य होतें. परंतु भांडवलदार साम्राज्यशाहीच्या विरोधी आघाडींत आपण उभे राहाणार असल्याची निःसंदिग्ध घोषणा माओ–त्से–तुंग यानें केल्यामुळें ती आशाहि नष्ट झालेली आहे. संपूर्ण चीन कम्युनिस्टांच्या आहारीं गेला कीं सीमोरेषेवर ब्रह्मदेशापर्यंत कम्युनिझम्‌चा प्रसार ही एक विशिष्ट कालावधीचीच गोष्ट आहे.

अमेरिकेचें आशियांतील दुसरें एक कांहींसें आशास्थान म्हणजे जपान होय. युद्ध संपल्यापासून आजपर्यंत एकट्या अमेरिकेचीच सत्ता जपानवर चालत आली आहे. इतर राष्ट्रांना कोणताहि महत्त्वाचा हस्तक्षेप अमेरिका करूं देत नाहीं. जपानशीं अखेरचा तह करण्यांत यावा अशी रशियाची मागणी आहे व अमेरिका नेमकी हीच गोष्ट दिरंगाईवर टाकीत आहे. रशियाला पूर्वेकडून शह म्हणून जपानचें अमेरिकेला महत्त्व वाटतें. परंतु जपानला आपल्या गोटांत ओढणें ही गोष्ट सोपी नाहीं. जपानची लोकसंख्या झपाट्यानें वाढत आहे. १९४५ सालीं ती सात कोटी वीस लक्ष होती, आज ती आठ कोटी झालेली आहे. या लोकसंख्येला योग्य असें राहणीचें मान द्यावयाचें[२] तर जपानी उद्योगधंदे व व्यापार यांचें पुनरुज्जीवन करावयास हवें. जपान सामर्थ्यशाली होऊं नये याविषयीं तर ऑस्ट्रेलिया–आदी राष्ट्रांचा आग्रह असणार. जपानचा परराष्ट्रीय व्यापारहि आज बराचसा कम्युनिस्ट कक्षेंत गेलेला आहे. कारण चीनशींच जपानचे युद्धपूर्वकालांत अत्यंत घनिष्ठ असे आर्थिक संबंध होते. यूरोपप्रमाणेंच जपानवरहि सतत देणगीच्या रूपानें खर्च करीत राहाणें अमेरिकेला मानवणार नाहीं. खुद्द जपानमध्यें कम्युनिस्ट प्रचार वाढत आहे. युद्धानंतर झालेल्या पहिल्या निवडणुकींत पांच कम्युनिस्ट निवडून आले होते. अलीकडे झालेल्या निवडणुकींत ३५ कम्युनिस्ट निवडून आलेले आहेत. महत्त्वाच्या उद्योगधंद्यांतील कामगारसंघटना कम्युनिस्टांच्या ताब्यांत आहेत. जपानी युद्धकैदी रशियानें परत करावे असा अमेरिकेचा आग्रह चालला होता; परंतु रशियानें परत पाठविलेल्या सैनिक–तुकडींतील सर्व सैनिक कम्युनिझमचे प्रचारक बनले असल्याचें पाहून अमेरिकेची 'भीक नको पण कुत्रा आवर' अशीच स्थिति झाली असल्यास नवल नाहीं. जपानशीं तह होऊन अमेरिकन सैन्य तेथून हालतें कीं तो देश सुलभपणें कम्युनिस्ट वर्चस्वाखालीं आणतां येईल या कल्पनेनेंच रशिया तहाची मागणी करीत आहे.

## अण्वस्त्राबाबत एक व्यवहार्य सूचना

अणु–अस्त्राची सिद्धि १९४७ पासूनच रशियानें प्राप्त करून घेतली असल्याची वार्ता कांहीं दिवसापूर्वींच प्रसिद्ध झाली. रशियाचें जागतिक संघर्षांतील सामर्थ्य यामुळें अनेकपटीनें वाढलें आहे. अणु–अस्त्राच्या साहाय्यानें तिसरें महायुद्ध लढविण्यांत आलें तर संस्कृतीचा सर्वविनाश याखेरीज अन्य कोणतेंहि भवितव्य मानवतेपुढें

---

[२] १९३०–३४ या कालांतील जपानचे रहाणीचें मान हें योग्य समजावें असें अतिपूर्व–समिती–( Far Eastern Commission )नें ठरविलें आहे.





अनुक्रमणिका

वाढून ठेवलेलें नाहीं ! परंतु दोनहि पक्षांकडे हें सर्वसंहारक अस्त्र असल्यामुळेंच कदाचित् त्याचा उपयोग करण्यांत येणार नाहीं ! अणुशक्तिनियोजनाच्या अमेरिकन योजनेप्रमाणें निरानिराळ्या राष्ट्रांतून अणुशक्ति–उत्पादनाच्या बाबतींत आंत जाऊन तपासणी व नियंत्रण करण्याचा हक्क अणुशक्ति-नियोजन समितीला मिळावयाचा होता. रशिया आपल्या अंतर्गत व्यवस्थेंत अशा रीतीनें कोणालाहि ढवळाढवळ करूं द्यावयास नाकबूल होता. अमेरिका अद्याप त्याच योजने ( Baruch Plan )चा आग्रह धरून आहे. यूनोच्या साधारण सभे-( U. N. O. General Assembly)चे या वर्षीचे अध्यक्ष रोम्युलो यांनीं मात्र या बाबतींत अधिक व्यवहार्य तडजोड सुचविली आहे. पहिल्या महायुद्धानंतर विषारी वायूवर ज्याप्रमाणें आन्तरराष्ट्रीय ठरावानें बंदी घालण्यांत आली त्याचप्रमाणें अणु–अस्त्र हें युद्धांत वापरूं नये अशी संमति सर्व राष्ट्रांकडून मिळवावी इतकेंच त्या योजनेंत अंतर्भूत आहे. दोनहि राष्ट्रांकडे तें अस्त्र असल्यानंतर हे संकेत सहसा मानले जात नाहींत

## भारताला महत्त्वाचें स्थान

आजच्या जागतिक राजकारणांत भारताला एक निश्चित महत्त्वाचें स्थान आहे. आशिया-खंडांत कम्युनिझमविरोधी आघाडीचें केंद्रस्थान एक भारतच होऊं शकेल. याच दृष्टीनें अमेरिकेच्या आशा आज भारतात गुंतल्या आहेत. आन्तरराष्ट्रिय बँकेकडून मिळणारा मदतीचा वाढता ओघ, आर्थिक दृष्ट्या मागासलेल्या राष्ट्रांना मदत देण्यासाठीं चाललेले प्रेसिडेंट ट्रूमन यांचे प्रयत्न, पंडित जवाहरलाल नेहरू यांचें अमेरिकेनें केलेलें भव्य स्वागत—या सर्व घटना याच गोष्टीच्या निदर्शक आहेत. पंडितजींच्या नेतृत्वाखालीं हिंदुस्थान उघडपणें अमेरिकनधार्जिणेपणाचें धोरण स्वीकारील ही गोष्ट शक्य नाहीं. आंतरराष्ट्रीय राजकारणांत भारतानें आजवर न्याय्य भूमिकाच स्वीकारली आहे. सुरक्षासमितीवर या खेपेला झालेली भारताची निवड ही एका दृष्टीनें भारताच्या आंतरराष्ट्रीय राजकारणाला मिळालेलें प्रशस्तिपत्रक समजावयास हरकत नाहीं. कर्तृत्वशून्य तटस्थता भारत कधींही स्वीकारणार नाहीं. ' कोणाचेंहि स्वातंत्र्य धोक्यांत असेल, अशा वेळीं भारत तटस्थ राहूं शकणार नाहीं, राहाणार नाहीं ' असा निर्वाळा पंडितजींनीं अमेरिकेला दिला आहे. परंतु रशिया–अमेरिका वादांत आपलीं पावलें कळत वा न कळत अमेरिकन गटाच्याच दिशेने पडत आहेत ही गोष्ट मात्र खरी. अमेरिकन भांडवलाला तर आपण आवाहन केलेंच आहे. भारताइतकेंच पाकिस्तानचेंहि अमेरिकेला या दृष्टीनें महत्त्व आहे; कारण रशियन सीमेवरील मध्यपूर्वेंतील मुसलमान राष्ट्रांचें नेतृत्व प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणें पाकिस्तानकडे येईल अशीच सर्वांची अपेक्षा आहे. मध्यपूर्वेंतील हा प्रदेश तेलानेंहि समृद्ध आहे. पाकिस्तान विरोधी राहिलें तर भारताच्या मदतीचाहि पूर्णपणें उपयोग करून घेतां येणार नाहीं. लियाकतअल्लीच्या मास्कोभेटीनंतर पाकिस्तानला चुचकारण्याचे प्रयत्न यासाठीं अवश्य करण्यांत येतील. काश्मीर–प्रकरणांत भारतानें तडजोडीची भूमिका स्वीकारावी असा आग्रह हाहि याच वृत्तीचा निदर्शक आहे. प्रत्यक्षांत काय काय घडतें तें यापुढें दिसेलच.

( ३–११–४९ )

---

' आशिया, यूरोप व अमेरिका यांचे प्रश्न आतां वेगवेगळे सोडवितां येणार नाहींत. ते सारे प्रश्न एकाच जागतिक समस्येचीं अंगें–उपांगें आहेत. भविष्यकाल तर कलह व क्लेश यांनीं भरलेला दिसतो. परंतु अनेक दिव्यांतून पार पडलेली मानवता याहि संकटाच्या पार जाईल असा माझा विश्वास आहे. '

—पं. जवाहरलाल नेहरू, कॅलिफोर्निया विद्यापीठापुढील भाषणांतून, २१ नोव्हें. '४९.

श्री. ना. गो. चापेकर

# आधिभौतिक विरुद्ध आध्यात्मिक

थोड्या महिन्यांपूर्वी एक विद्वान् शास्त्री आपल्या प्रवचनांत 'जग हें मिथ्या असल्यामुळें तद्विषयक ज्ञान संपादन करण्याच्या कामीं आयुष्य खर्ची घालणें हा वेडेपणा आहे' असा उपदेश आपल्या श्रोत्यांना करीत होते. ह्या विद्वान् शास्त्र्यांचें अज्ञान हें त्यांच्यापुरतेंच असतें तर तिकडे दुर्लक्ष करणें योग्य होतें. परंतु भौतिक ज्ञानाविषयींचा हा समज बहुजनसमाजांत बऱ्याच अंशानें पसरलेला असल्यानें त्याची उपेक्षा करणें आत्मघातकीपणाचें होईल. कारण हिंदु समाजाची अवनति होण्याचें हा गैरसमज हें एक प्रमुख कारण आहे.

## ज्ञान व विज्ञान

आगबोटींतून दूरचा प्रवास करीत असतांना ज्याप्रमाणें घड्याळें बदलावीं लागतात त्याप्रमाणेंच विचारांची गति सारखी चालू असल्यामुळें शब्दांचे अर्थ बदलण्याचे प्रसंग वारंवार उद्भवतात. एखादा विशिष्ट विचार व्यक्त करतांना जो शब्द निर्माण होतो तोच शब्द विचारांच्या स्वरूपांत बदल झाला तरी हा झालेला बदल व्यक्त करण्याकरता उपयोजिण्यांत येतो. अर्थात् थोडासा बदल झाला तरी त्या बदललेल्या अर्थाचा देह निराळा असणें आवश्यक आहे. परंतु प्राचीनकाळीं, लोकांत रूढ झालेला व लोकांना प्रिय असलेला शब्द झुगारून देणें हें त्यावेळच्या परिस्थितींत हितावह नव्हतें. अलीकडे मात्र विशेषतः पाश्चात्य राष्ट्रांत आपल्या स्वतंत्र विचाराकरतां स्वतंत्र शब्द निर्माण करण्याचा प्रघात पडत चाललेला आहे. आमच्याकडेहि नवनि शब्द निर्माण करण्याची हौस वाढत्या प्रमाणांत दृष्टोत्पत्तीस येते; तथापि विचारांतराकरितां ही निर्मिति नसून केवळ नावीन्याच्या हौसेखातर ही शब्दांची टांकसाळ झडत असते. जुन्याच शब्दांकडून नवीन विचार प्रदर्शित करून घेतला असतां अर्थाविषयीं गैरसमज माजणें अगदीं स्वाभाविक आहे. ज्ञान शब्दाची अवस्था कांहीं अंशीं अशाच स्वरूपाची झाली आहे. ह्या शब्दाचे अनेक अर्थ होतात. कोणत्याहि पदार्थाची जाणीव होणें ह्यालाहि आपण ज्ञान म्हणतों; तसेंच आत्मविषयक जाणिवेलाहि ज्ञान ही संज्ञा लावण्यांत येते. परंतु वेदान्ताच्या परिभाषेंत ज्ञान हा शब्द एकाच अर्थानें वापरतात. मीच ब्रह्म आहे हा जो साक्षात्कार, ह्याला ज्ञान असें म्हटलें जातें. हा साक्षात्कार किंवा हें ज्ञान झाल्याशिवाय मोक्ष मिळत नाहीं हा वेदान्त्यांचा सिद्धान्त आहे. भौतिक ज्ञानाला विज्ञान हा पारिभाषिक शब्द असलेला सर्वांस माहितच आहे. हिंदूंनीं मनुष्यमात्राचें ध्येय 'मोक्ष' हें निश्चित केलें आहे. हें ध्येय ज्या शास्त्राच्या योगानें साध्य होईल तेंच महत्त्वाचें शास्त्र समजलें जाणें ह्यांत कांहीं गैर नाहीं. अध्यात्मज्ञान हेंच खरें ज्ञान असेंहि ह्याच कारणात्तव म्हटलें जातें.

## ज्ञानापेक्षां विज्ञान हें अत्यावश्यक

परंतु असें म्हटलें जाणें जरी स्वाभाविक आणि क्षम्य असलें तरी त्याच्याविरुद्ध जो सिद्धांत कीं भौतिक ज्ञान हें खोटें असा प्रतिपादिला जातो, तो मात्र निराधार आहे हें पुष्कळांच्या लक्षांत येत नाहीं. विज्ञानाचा आधार जगत् आणि ज्ञानाचा आधार आत्मा अथवा ब्रह्म किंवा जीवशिवैक्य. आतां वेदान्ताप्रमाणेंच अहं व ब्रह्म ह्यांच्या तादात्म्याची अनुभूति जोंपर्यंत झाली नाहीं तोंपर्यंत

जग सत्य नाहीं असें म्हणणें चुकीचें होणार आहे. शंकराचार्यांनीं जगाचें व्यावहारिक सत्यत्व प्रतिपादिलें आहे. जगत् आणि ब्रह्म ह्यांचा संबंधच असा आहे कीं एक जेव्हां असतें तेव्हां दुसऱ्याचा पूर्णपणें अभाव असतो. जोंपर्यंत मनुष्याला जगाचा अनुभव येत असतो तोंपर्यंत त्याची व ब्रह्माची गांठ होणें अशक्य आहे; आणि 'अहमेव ब्रह्मास्मि'च्या अनुभूतींत जग शिल्लक राहत नाहीं. ह्यावरून हे दोन स्वतंत्र विषय आहेत हें समजण्यास अडचण पडणार नाहीं. अध्यात्मविद्येंत प्रवेश केल्यानंतर जगद्विषयक ज्ञानसाधनांचा अव्हेर केला तर तो मान्य होण्यासारखा आहे. कारण जगाचा त्याग करून मनुष्य निराळ्याच प्रांतांत गेलेला असतो. म्हणून त्याग केलेल्या मार्गाचें पुनः चिंतन करण्याचें कारणहि नाहीं व तें युक्तहि होणार नाहीं. येथें हें ध्यानांत ठेवणें अवश्य आहे कीं, ह्या नवीन योजलेल्या मार्गांत कोणासहि अधिकाराशिवाय पदार्पण करतां येत नाहीं. अनधिकाऱ्यांनीं अध्यात्माची शाब्दिक चर्चा यथेच्छ करावी; परंतु तिला फळ येण्यासारखें नसल्यामुळें तें वन्ध्यमैथुन होय. असा अधिकारी पुरुष 'कोटिसहस्रेषु' एखादाच असतो. आपला अधिकार जगाविषयींच विचार करण्याचा आहे. अर्थात् आपल्या ज्ञानाचा विषय जग हाच होय. ह्या दृष्टीनें ज्ञानाहूनहि विज्ञान अधिक महत्त्वाचें ठरतें. कारण आपण आहों ह्या परिस्थितींत आपल्या सुखाचें तेवढेंच एकमेव साधन आपणांस उपलब्ध आहे. निदान प्राथम्य तरी भौतिक ज्ञानालाच देणें आपणांस म्हणजे बहुजनसमाजास अपरिहार्य आहे. हें जर आपण मान्य केलें नाहीं तर आपण दुःखसागरांत निमग्न झाल्यावांचून राहणार नाहीं. आणि हाच अनुभव आज आपणांस येत आहे. ब्रह्मज्ञान आटोक्याच्या बाहेर आणि भौतिक ज्ञानाची हेटाळणी असें झाल्यानें आपणांपुढें कोणतेंच ध्येय राहत नाहीं. आपण एका मार्गावर उभे राहून दुसऱ्या मार्गाची जल्पना करतों; त्यामुळें पायाखालचा मार्ग निसटतो आणि दुसऱ्याला पाय लागत नाहीं अशी केविलवाणी स्थिति प्राप्त होते. भौतिक आयुष्यक्रमण चालूं असतां भौतिक ज्ञानाचा तिरस्कार करून कधींहि चालणार नाहीं. म्हणजेच त्याला प्रपंच नेटका करतां येणार नाहीं हें उघड आहे. आणि ज्याला प्रपंच साधला नाहीं त्याला परमार्थहि असाध्यच राहणार हें तितकेंच खरें आहे. ह्यावरून भौतिक ज्ञान अत्यावश्यक आहे ह्याविषयीं कोणासहि संशय वाटण्याचें कारण नाहीं.

भौतिक ज्ञानाची आवश्यकता मान्य झाल्यावर-सुद्धां तें ज्ञान खोटें आहे हें जें वारंवार मनावर बिंबविलें जातें त्याचा आतां विचार करूं.

अपरा विद्या ही परा विद्येच्या सापेक्षतेनें मायावी अथवा असत्य म्हणतां येईल. परंतु वर सांगितल्या-प्रमाणें ब्रह्मविद्येला आपण पात्र झालों नाहीं तोंपर्यंत सापेक्षतेचा प्रश्नच उत्पन्न होत नाहीं. एका भौतिक ज्ञानाची प्राप्ति व्हावी म्हणूनच आपणांस धांवपळ करणें जरूर आहे. हें ज्ञान अपुरें आहे हें खरें. पण तें पूर्ण करून घेण्याचें सामर्थ्य देवानें मानवाला दिलें आहे. मनुष्याच्या बुद्धीची जसजशी वाढ होत जाईल तसतश्या भौतिक ज्ञानाच्या पायऱ्या आपण भराभर चढत जाऊं. ज्या गोष्टी आतांपर्यंत अज्ञात होत्या त्यांवर प्रकाश पडून त्या उत्तरोत्तर ज्ञात होत जातील. ह्या दृष्टीनें हें ज्ञान अपुरें वाटल्यास नवल नाहीं. न जाणों कदाचित् भौतिक ज्ञानाचें पर्यवसान अध्यात्मांत होण्याचा संभव आहे. गेल्या पन्नास वर्षांत संशोधकांनीं असंख्य शोध लावून ही ज्ञानाची उंची कमालीची वाढविली आहे. तरी पण याची सीमा मनुष्यानें गांठली आहे असें म्हणण्याचें धाडस कोणीच करणार नाहीं. ह्याचें सर्व श्रेय पाश्चात्यांना दिल्याशिवाय गत्यंतर नाहीं.

ह्यानंतर दुसऱ्या एका अंगाचा विचार करूं. कांहीं आक्षेपकांच्या म्हणण्याचा असा आशय दिसतो कीं, आत्मसाक्षात्कार न झालेल्यांना भौतिक ज्ञानहि अप्राप्य आहे, स्वानुभूतीच्या तंद्रींत जगत् प्रकाशमान होतें आणि त्यामुळें आत्मसाक्षात्कार झालेल्या ज्ञान्याला भौतिक-ज्ञानागम हा हातावरचा मळ होय. हा आक्षेप अशास्त्रीय आहे. कारण आत्मसाक्षात्कारांत जगावर प्रकाश पडण्याला जगच शिल्लक राहत





अनुक्रमणिका

[illegible] नाहीं, तेथें जगावर [illegible], जग दिसतें असें [illegible] त्या जगाचें स्वरूप [illegible] लागत नाहीं. अर्जुनाला [illegible] आज आपण जीं विमानें [illegible] असल्याचें कोठेंहि [illegible], वृक्ष, पशु, पक्षी, [illegible] आलीं. तथापि [illegible] संयोगानें अथवा [illegible] निर्माण झाले आहेत [illegible] असें म्हणण्याचें [illegible] वाटत नाहीं. अशीहि [illegible] ज्ञानाच्या अंतिम सर्मिचें [illegible] पडलें तरी त्यांची [illegible] नाहीं तोंपर्यंत त्या [illegible] होणार नाहीं. विजेचा [illegible] बीज उत्पन्न करतां [illegible] अनंत प्रक्रिया [illegible] शकतात असेंहि [illegible] भौतिक ज्ञानाला [illegible] असें प्रतिपादन [illegible]

[illegible]

[illegible] दोन ज्ञानें भिन्न [illegible] आत्मज्ञानाचा उपयोग [illegible] विचारावासा वाटेल. [illegible]. मनुष्य कांहींतरी [illegible] करीत आला आहे. [illegible] सृष्टि असे दोन [illegible] कसा असावा [illegible] झालें तर, कधींच [illegible] सृष्टीचा मनुष्यप्राणी [illegible] व मनुष्येतर सृष्टि [illegible] तें योग्यच आहे. [illegible] जास्तींत जास्त [illegible] करून घेणें हें [illegible] मनुष्यामनुष्यांमध्येंच [illegible] भोक्ता आणि भोग्य

हा भेद मनुष्यप्राण्यांत करितां येईल काय ? थोडक्यांत म्हणजे मनुष्यांच्या परस्परवागणुकीचे नियम कोणते असावेत ह्याचा विचार करतांना मोठमोठ्यांचीं मनें संशयाकुल झालीं आहेत. आजपर्यंतचा इतिहास आपणांस हें स्पष्ट ध्वनित करतो कीं प्रबल व दुर्बल असे मनुष्याचे दोन वर्ग पाडून प्रबल हा भोक्ता व दुर्बल हा त्याचें भोग्य हें तत्त्व मोठेपणानें अंगीकारलें गेलें आहे. ह्याच्या उलट मनुष्य म्हटला कीं, तो येथून तेथून सारखाच. केवळ बौद्धिक सामर्थ्यावर एकानें दुसऱ्यास लुबाडण्याचा अधिकार नाहीं हेंहि तत्त्व प्रतिपादन करण्यांत आलें आहे. समानतेच्या, मानव्याच्या, न्यायाच्या भूमिकेवरून मनुष्यांनीं परस्परांशीं वागतांना वर्तन ठेवावें असा उपदेश-हि केला जातो. ह्यापैकीं कोणतें तत्त्व आपण अंगीकारावें ह्याचा विचार प्रत्येकाला करणें प्राप्त आहे. ईश्वर नाहीं, आत्मा नाहीं, पुनर्जन्म नाहीं, मग मी माझ्या बुद्धिबलावर परवित्ताचा अपहार कां करूं नये, धर्माचीं व नीतीचीं बंधनें कां पाळावीं असें कोणीहि विचारणारच. माझ्या ऐहिक हिताच्या दृष्टीनें दुसऱ्याशीं न्यायानें वागणें सोयीचें असल्यास मी न्यायानें वागेनहि. परंतु अन्याय्य म्हणून समजलें जाणारें आचरण करण्यांत माझी कोणत्याहि प्रकारें हानि होण्याचा संभव नसल्यास मी धर्माच्या अगर नीतिच्या आज्ञा कां मानाव्या ? ही आपली वागणूक निश्चित करण्या-करतां मानवांचें ध्येय ठरवावें लागतें. हें ध्येय म्हणजे परमात्मस्वरूप होणें हें आमच्या ऋषींनीं आमच्याकरतां निश्चित करून ठेविलें आहे. परमात्म-स्वरूपीं लीन होणें ह्याचाच अर्थ जन्ममृत्यु कायमचा टाळणें हा होय. आत्मसाक्षात्काराशिवाय मोक्ष नाहीं. त्याकरितां ‘ मीच ब्रह्म आहे ’ ह्या ज्ञानाची प्रक्रिया समजावून घ्यावी लागते. ह्या ज्ञानयज्ञाची दीक्षा घेणाऱ्याला अधिकार असावा लागतो; तो अधिकार मिळविण्याकरितां चित्तशुद्धीची गरज असते; आणि ही चित्तशुद्धि निष्काम कर्मानें, परोपकार करून, समतेनें अथवा आत्मौपम्यबुद्धीनें सर्वांशीं वागून, जनसेवा करून व अशाच प्रकारच्या अन्यकर्मांनीं संपादितां येते. धर्मशास्त्र व नीतिशास्त्र आपली संसारांत वागणूक कशी असावी ह्याचा



अनुक्रमणिका

आदेश देण्याकरितां प्रवृत्त झालीं आहेत. भौतिक ज्ञानाची वाढ व्हावी म्हणून जन्मभर संशोधन करणारे शास्त्रज्ञ ह्यांची चित्तशुद्धि त्यांच्या त्या निरपेक्ष व्यासंगामुळेंच होत असते. तेंहि एकप्रकारचें निष्काम कर्मच होय. हिंसा, जुलूम, अपहार ह्यांच्या योगानें चित्त मलिन होतें व मोक्ष दूरावतो. विश्वाचा नाश करण्याकरतांच ॲटम बॉंबचें संशोधन केलें असल्यास त्या संशोधकांना मोक्ष मिळण्याची आशा नसते. ह्या दृष्टीनें ज्ञानाचें ध्येय अति महत्त्वाचें मानतात.

पारमार्थिक ध्येय सर्वांचें एकच असतें असें नाहीं. केवळ कल्पनेनें निश्चित केलेलीं ध्येयें निरनिराळीं असल्याचें अनुभवास येतें. वेदांत्याचा आत्मानुभव मात्र कल्पनाजन्य नाहीं; ती एक प्रत्यक्ष अनुभवण्याची स्थिति आहे. जे ईश्वर अथवा पुनर्जन्म मानीत नाहींत त्यांच्या कोशांत परमार्थ हा शब्दच असण्याचें कारण नाहीं. ह्यास्तव शिक्षेला पात्र होणार नाहीं अशा रीतीनें कायद्याचें पालन करणें हेंच त्यांचें ध्येय. अर्थात् त्यांची नीति म्हणजे व्यावहारिक नीति होय. धर्माचें तर ते नांवहि घेणार नाहींत. अशा तऱ्हेचे नास्तिक आजपर्यंतच्या जगांत फारच थोडे होऊन गेले.

## नीतितत्त्वें हीं अध्यात्मनिरपेक्ष

वरील विधानें आजपर्यंतच्या कालाला अनुलक्षून केलेलीं आहेत हें सांगणें अवश्य आहे. इतःपर केवळ तर्कगम्य असलेला ईश्वर अथवा पुनर्जन्म हा नीतितत्त्वांचा आधारस्तंभ मान्य करण्यास भावी पिढी तयार होणार नाहीं अशीं चिन्हें स्पष्ट दिसत आहेत. मला वाटतें, व्यावहारिक दृष्टीनें विचार केला तरी सुद्धां नीतितत्त्वांची आवश्यकता सिद्ध करतां येईल. 'चापेकर-संस्मृति' ह्या ग्रंथांतील माझ्या लेखांत हा सिद्धांत मी प्रतिपादन केला आहे. मी तेथें म्हटलें आहे, "नीतिकल्पनांचा उगम (मानवांतच आढळणाऱ्या त्याच्या) विवेकशक्तींत आहे. नीतितत्त्वांचा उपदेश बाहेरून कोणी आपणांस करीत नाहीं; ईश्वरानें केला आहे असें समजण्याचें कारण नाहीं. चांगलें-वाईट वाटणें हा मानवी स्वभावाचा एक भाग आहे. त्याच्या शरीराच्या अवयवांप्रमाणें त्याच्या मनाचे ते अवयव आहेत. आतां, निन्द्य-वन्द्य हें द्वन्द्व समजण्याचें सामर्थ्य सर्वांचें सारखें नसतें. त्या शक्तींवर संस्कार होऊन ती प्रगल्भ दशेला हळुहळु येत असते. सारांश, मनुष्यांमध्यें चांगलें-वाईट जाणण्याच्या शक्तीचें अस्तित्व आहे म्हणून मनुष्य हा नीतिमान् प्राणी आहे असें म्हणावें लागतें. योग्य परिस्थिति व अनुरूप शिक्षण ह्यांच्या योगानें ही मानवी शक्ति वाढविणें अथवा सुधारणें हें सरकारचें अथवा जनतेचें कर्तव्य समजलें पाहिजे."

ह्यावरून ईश्वर-पुनर्जन्मनिरपेक्ष अशी नीति-तत्त्वांची उभारणी आपणांस करतां येईल ह्यांत संदेह नाहीं. पशूंतून मनुष्य आला आहे. पशूंत मनोविकार असतात. आनुवंशिक पद्धतीनें ते माणसांत उतरले आहेत. म्हणून ते मनुष्यामध्यें मूलतःच प्रबळ असतात. परंतु हे मनोविकार घातक आहेत, असें समजण्याचें कारण नाहीं. त्यांचें नियमन करून समाजाच्या हितार्थ त्यांचा उपयोग करण्याचें कार्य मनुष्य विवेकशक्तीच्या साहाय्यानें करतो. ही शक्ति प्रथमच मानवांत निर्माण झाल्यामुळें संस्काराशिवाय ती विकसित होत नाहीं. परंतु ही शक्ति शिक्षणाच्या योगानें एकदां विकास पावली म्हणजे मनुष्यप्राणी समाजाचा एक उपयुक्त घटक असा होईल. कारण समाजाच्या कल्याणांत व्यक्तिचें कल्याण असतें. व्यक्ती मिळून समाज होतो हें उघडच आहे. परंतु मनुष्याच्या विकासास भोंवतालच्या समाजाकडूनच पोषक द्रव्यें मिळत असल्यामुळें समाजाकरितां व्यक्ति आहे असें म्हणणें भाग आहे. कारण, समाजाच्या मदतीशिवाय व्यक्तिचा विकास होणें अशक्य आहे. म्हणून समाज टिकविण्याची जबाबदारी व्यक्तीवर पडणें साहजिक आहे. ही जबाबदारी पार पाडण्याकरितां त्यानें आपलें मानासिक, शारीरिक व बौद्धिक सामर्थ्य परमोच्चांशापर्यंत वाढविल्याशिवाय गत्यंतर नाहीं. हें त्याचें कर्तव्य आहे. कारण आपण ध्यानांत ठेवलें पाहिजे कीं अनीतिमान् माणूस समाजाच्या उन्नतीला कारणीभूत होणार नाहीं. ह्यामध्यें तो समाजाचा नाश करतो व अखेरीस आपणहि नष्ट होतो.





अनुक्रमणिका

ह्याकरतां त्यानें नीतिबंधनें पाळणें भाग आहे. समाज सामर्थ्यवान् होण्यास अशा प्रकारचें शिक्षण लहानपणापासून व्यक्तीस मिळालें पाहिजे. तात्पर्य, अध्यात्मांत न शिरतांहि आपला व समाजाचा उत्कर्ष करणें शक्य आहे.

## अंतर्ज्ञान आत्मज्ञानाहून निराळें

अध्यात्मज्ञानानें म्हणजे स्वानुभूतीनें भौतिक ज्ञान संपादन होण्याची आशा नाहीं हें वर सांगितलेंच आहे. परंतु त्याशिवाय अंतर्ज्ञान ह्या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या दुसऱ्या एका ज्ञानाचा उल्लेख करणें आवश्यक आहे. ज्या गोष्टी ज्ञानेंद्रियांनीं समजत नाहींत त्या अंतर्ज्ञानानें समजतात ही समजूत प्राचीनकालापासून आजपर्यंत अव्याहतपणें सर्व समाजांत प्रचलित असल्याचें अनुभवास येतें. परोक्ष गोष्टींचें ज्ञान ध्यानस्थ ऋषींना अंतर्ज्ञानानें प्राप्त झालें अशा प्रकारची माहिती आपणांस पुराणांत मिळते. आजहि ह्या अंतर्ज्ञानाचे पुरस्कर्ते (थिऑसफिस्ट) आहेतच. आयर्लंडला स्वराज्य मिळणार ही गोष्ट अंतर्ज्ञानानें मला समजली आहे असें ॲनी बेझंट ह्यांनीं एका व्याख्यानांत सांगितल्याचें पुष्कळांस आठवत असेल. अशा प्रकारच्या ज्ञानाची शक्यता कोणास पटेल, कोणास पटणार नाहीं. परंतु ब्रह्मानंदाचा अनुभव ज्या अवस्थेंत मिळतो असें म्हणतात, तिच्याहून ही अंतर्ज्ञानाची अवस्था भिन्न आहे ह्यांत शंका नाहीं. अंतर्ज्ञान आणि आत्मज्ञान हीं एक नव्हत. म्हणून ह्या अंतर्ज्ञानाचा अधिक विचार येथें करण्याचें प्रयोजन नाहीं.

आपल्याकडे ' मला साक्षात्कार झाला आहे ' असें सांगणारीं अनेक माणसें आढळतात. परंतु साक्षात्कारस्थितीचें सविस्तर वर्णन लिहिलेलें फारसें आढळण्यांत नाहीं. त्यामुळें सर्वांचे अनुभव ताडून पाहण्यास कोणतेंच साधन उपलब्ध नाहीं. युरोपियन लोकांनीं—स्त्रीपुरुषांनीं—आपापले अनुभव लिहून ठेवले आहेत. त्या सर्वांचा परामर्श जेम्सनें, ' व्हरायटीज ऑफ रिलिजिअस एक्सपीरिअन्स ' (आध्यात्मिक अनुभवाचे प्रकार) ह्या आपल्या ग्रंथांत घेतला आहे. त्यांमध्यें आनंदमय अशी जी एकात्मता तिचाहि अनुभव आल्याचें वर्णन आहे. भ्रांतीचे प्रकार आहेत ते निराळे. कित्येक अनुभव जगासंबंधीं असतात ह्या अनुभविकांना भविष्यकालीं घडणाऱ्या गोष्टी प्रत्यक्ष दिसतात; दुसऱ्याच्या मनांतील विचार ते समजूं शकतात; अपरिचित भाषा ज्ञात होते; त्यांची आकलन शक्ति एकदम उमलते व अवघड विषय सुगम होतो. अशा प्रकारचें ज्ञान इन्द्रियजन्य असो अथवा इन्द्रियातीत असो. तें आध्यात्मिक ज्ञान नव्हे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. अद्वैताचा अनुभव ह्याहून वेगळा.

अद्वैतानुभवांत जाणिवेची विविधता पार नष्ट होते. केवळ एकाच स्वरूपाची जाणीव राहते. पंच ज्ञानेंद्रियांचें कर्म स्थगित होतें. एकत्व, अनंतत्व व आनंद हें ह्या अवस्थेचें वैशिष्ट्य होय. आत्मविषयक जागृति उत्पन्न झाली कीं जगद्विषयक निद्रा येते. ' अहं 'चा लोप होतो; मग विषय आणि विषयी कोठें राहणार ! निःशरीर असा आत्मा—एकच एक. व्यवहारांत जगाचा अनुभव आपण विविध वस्तूंच्या रूपानें घेतो. ह्या सर्व वस्तू साकार अतएव मर्यादित असतात; म्हणून इन्द्रियांनीं होणारें हें ज्ञानहि मर्यादित असतें. अद्वैतानुभवांत साकारत्व नष्ट होतें. दिक्कालाचाहि मागमूस लावणें अशक्य होतें. त्यामुळें अनुभवितां येणारें ज्ञान मुद्धां बुद्धींद्रियांना अगोचर, अमूर्त असेंच असणार. तें शब्दांचा वर्ण्य विषय बनत नाहीं. आत्मसाक्षात्कार हा अशा स्वरूपाचा असतो.

ह्या अनुभवाची आणि विश्वदर्शनाची गफलत केली जाते तें चुकीचें आहे. विश्वदर्शनांत सृष्टीची परिपाटी समजते; ज्ञानेंद्रियें प्रकाशमान होतात; इतकीं कीं माणसाचें जीवन पार पालटून जातें; नीतिदृष्ट्या तो अत्यन्त, उन्नत असा होतो; आणि हळूहळू जीविताचा शाश्वतपणा त्यास पटूं लागतो. अद्वैतानुभवाहून ही खालची पायरी आहे.

सारांश, भौतिक ज्ञान आणि आध्यात्मिक ज्ञान ह्यांची तुलना करणें चुकीचें आहे. एखादादुसरा अपवाद वगळून बाकी सर्व जगाला भौतिक ज्ञानाचीच आवश्यकता आहे. आणि कोणत्याहि कारणानें त्या ज्ञानाला हिणकस ठरविणें म्हणजे आत्मनाश करणें होय.





अनुक्रमणिका

श्री. ह. कृ. मोहनी

# सर्वोदयीन आर्थिक धोरणाची दिशा

सर्वोदय-समाजातर्फे ७–८ नोव्हेंबर रोजीं निमंत्रित लोकांची एक लहानशी आर्थिक परिषद् बोलावण्यांत आलेली होती. ती परिषद् सर्वोदय–समाजाचे चिटणीस श्री. रघुनाथराव घोत्रे ह्यांनीं सर्वोदय-समाजांत जिव्हाळ्यानें लक्ष घालणाऱ्या कांहीं योड्या भारतीय वजनदार पुढाऱ्यांच्या सल्लामसलतीनें भरविली. गांधी-विचारानें ज्यांच्या जीवनांत प्रभुत्व मिळविलेलें आहे, आणि गांधीजींच्या मतांचें सुकाणूं धरून जे आपली जीवननौका ह्यापुढेंहि चालवूं इच्छितात, असे थोडे सर्वोदय–समाजाचे क्रियाशील सभासद वर्ध्यास एकत्रित झालेले होते. त्यांनीं गांधीजींच्या मतांचा ताजवा लावून भारतांतील सध्यांच्या आर्थिक परिस्थितीचें स्थूल आलोचन केलें. सद्यःस्थितींत गांधीजींचें अनुयायित्व पत्कर-णाऱ्या देशांतील लोकांस उपयोगी पडेल असा प्रथम एक आर्थिक आराखडा बनवावा, तो आराखडा डिसेंबरच्या शेवटच्या आठवड्याच्या आरंभीं गांधीमतांशीं अविरोधी असलेल्या कांहीं आर्थिक तज्ज्ञांपुढें मांडून, देशांतील सध्यांच्या आर्थिक परिस्थितीचा अधिक विचार करावा, आणि नंतर ३१ जानेवरीला ह्या विचारांची आर्थिक आयोजन-पत्रिका ( Blue Print ) प्रसिद्ध करावी असा निर्णय ह्या सर्वोदय-समाजाच्या आर्थिक परिषदेनें वर्ध्यास घेतलेला आहे.

'सर्वोदय-समाज' हा गांधीजींच्या विचारावर निष्ठा ठेवणाऱ्या लोकांचा बंधनरहित, विरल असा समूह आहे. सर्व–सेवा–संघ ह्या नांवाची दुसरी एक संघटना गांधीजींच्या दृष्टिकोनाप्रमाणें विधायक कार्य करणाऱ्या अनेकविध संस्थांचे प्रमुख एकत्रित येऊन निर्माण करण्यांत आलेली आहे. गांधीजींच्या मृत्यूनंतर गेल्या बावीस महिन्यांच्या काळांत ह्या संघटना निर्माण झालेल्या आहेत. गांधी-विचाराच्या दृष्टीनें कार्य करणाऱ्या लोकांस सध्यांच्या परिस्थितींत निश्चित अशा आर्थिक दिशेची आवश्कता आहे. वर्ध्यास भरविण्यांत येणाऱ्या ह्या लहानशा आर्थिक परिषदेचा हेतु गांधीमतानुसारी लोकांच्या विचारास निश्चित दिशा दाखवावी असा आहे.

देशास स्वातंत्र्य मिळाल्यानंतर गांधीजींच्या ह्यातींतच गांधीजींच्या अर्थकारणासंबंधीं आपल्या स्वराज्यांत कोणतें धोरण स्वीकारणें योग्य होईल ह्या-बद्दल देशांत विचारचक्र सुरूं झालेलें होतें. स्वराज्य-प्राप्तीनंतर ताबडतोब देशापुढें फाळणीनें निर्माण झालेले अनपेक्षित पण भयंकर प्रश्न उभे राहिले आणि गांधीजींचें नेतृत्व त्या आनुषांगिक व प्रसंगोपात्त निर्माण झालेल्या मोठ्या प्रश्नांत सर्वस्वीं व्यग्र राहिलें. गांधीवादी अर्थकारणाच्या प्रश्नास ध्येय-धोरणाच्या दृष्टीनें निश्चित दिशा प्राप्त होण्यास हा गेल्या तीन वर्षांतील काळ फार प्रतिकूल होता. गांधीजींस ह्या प्रश्नांचा विचार करण्यास मुळींच उसंत किंवा फुरसत मिळाली नाहीं. गांधीजींची हत्या होण्यापूर्वीं थोडेच दिवस गांधीवादी कार्य-कर्त्यांनीं कौन्सिलांतून चाललेलें कार्य, पार्लमेंटरी राजकारण, विधायक कार्यक्रम आणि देशापुढील अर्थ-व्यवस्था ह्या बाबतींत कोणतें धोरण पत्करावें ह्या-बद्दल विचारविनिमय करण्यासाठीं वर्ध्यास एकत्र यावें, आणि गांधीजींकडून ह्या अनेक प्रश्नांसंबंधीं निर्णय करून घ्यावा असें ठरलें होतें. परंतु गांधी-जींच्या अचानक हत्येमुळें हे प्रश्न अनिर्णीतच राहिले.



अनुक्रमणिका





# सर्वोदयीन आर्थिक धोरणाची दिशा

स्वराज्यप्राप्तीनंतर अखिलभारत–काँग्रेसकमिटीचे चिटणीस श्री. शंकरराव देव यांनीं देशांतील विधायक कार्यामध्यें एकसूत्रीपणा राखण्यासाठीं महत्त्वाच्या विधायक कार्यसंघटकांची मिळून एक मध्यवर्ती समिति ऑलइंडियाकाँग्रेसकमिटीच्या तर्फे स्थापन केलेली होती. आणि सध्यांचे सर्वोदयसमाजाचे चिटणीस श्री. रघुनाथराव धोत्रे हेच त्याहि समितीचे चिटणीस होते, श्री. रघुनाथराव धोत्रे हे गांधीसेवासंघाचे चिटणीस अनेक वर्षें असल्यामुळें गांधीजींच्या सर्वांगीण विचाराशीं ते सुपरिचित आहेत. आणि पार्लमेंटरी कार्यांत न पडतां त्यांनीं गांधीजींच्या रचनात्मक कार्यांतच जीवन व्यतीत केलें आहे. देशांतील स्वराज्योत्तर काळांमधील विधायक कार्यांत सुसंगति व एकीकरण उत्पन्न करण्यासाठीं स्थापन झालेली ही समिति देशांतील गेल्या अडीच वर्षांतील निरनिराळ्या प्रकारच्या संकट परंपरेमुळें फारशी कार्यान्वित होऊं शकली नाहीं. गांधीजींचें अर्थकारण त्यांनींच निर्माण केलेल्या अनेकविध विधायक कार्यांशीं सर्वस्वीं एकजीव झालेलें आहे; आणि म्हणून गांधीजींच्या दृष्टिकोनाप्रमाणें सध्यांच्या आर्थिक परिस्थितीचा विचार करावयाचा असल्यास, तो विचार गांधीजींच्या मतानें चाललेल्या विधायक कार्य करणाऱ्या संस्थांच्या चालकांव्यतिरिक्त फलद्रूप होऊं शकत नाहीं.

गांधीजींचें अर्थकारण अहिंसेवर सर्वस्वीं आधारलेलें होतें हें आतां सांगण्याची आवश्यकता नाहीं. आजकालच्या कोणत्याहि देशाच्या अर्थकारणाचा संबंध राजकारणाशीं आणि राज्यसंस्थेशीं येतो. अर्थकारण हें राजकारणाचें एक महत्त्वाचें अंगच आहे. पाश्चात्य सुसंस्कृत राष्ट्रांत चतुर्विध पुरुषार्थांत अर्थच सर्वस्वीं प्रधान पुरुषार्थ बनला आहे. गांधीजींचेंहि अर्थकारण राजकारणापासून पराङ्मुख राहूं शकत नाहीं. आपलें स्वराज्य स्थापन होण्यापूर्वीं गांधीजींचें अर्थशास्त्र त्यांच्या राजकारणाशीं अगदीं संलग्न असें होतें. गांधीजींनीं आपलें अर्थशास्त्र खादी, ग्रामोद्योग, खेड्यांचें स्वावलंबी सामाजिक समुत्थान, वर्धाशिक्षणयोजना ह्यांतच संगृहीत केलेलें होतें. ह्या अनेकविध रचनात्मक कार्यांचा संबंध त्यांनीं वैयक्तिक व सार्वत्रिक सविनय कायदेभंगाशीं जोडलेला होता. आणि सविनय कायभंग हा सर्वांगीण अन्यायनिवारणासाठीं गांधीजींनीं कारणपरत्वें आचरून दाखविलेला होता. हा रचनात्मक कार्याचा सर्व प्रयत्न आणि कायदेभंगाची चळवळ ह्यांचें पर्यवसान स्वातंत्र्यप्राप्तींत होणार आहे असा आत्मविश्वास स्वराज्योत्सुक अशा हिंदुस्थानी जनतेंत त्यांनीं निर्माण केलेला होता. गांधीजींचें अर्थशास्त्र नीतिशास्त्रावर आधारलेलें होतें आणि ह्या नीतिशास्त्राची चैतन्यशक्ति किंवा प्राण सविनयकायदेभंगात केंद्रित झालेला होता. गांधीजींचें धर्मशास्त्र, नीतिशास्त्र, अर्थशास्त्र, राजकारणशास्त्र व समाजशास्त्र हीं सर्व एकाच प्रकारची संयोजनात्मक क्रिया होती. आणि हें सर्वांगीण संयोजन गांधीजी ह्या अद्वितीय व्यक्तीमध्यें केंद्रित झालेलें होतें.

गांधीजी हयात असतांनाच आपलें स्वराज्य प्रस्थापित झालेलें होतें. स्वराज्यप्राप्तीनंतर गांधीजी सहा महिन्यांतच दिवंगत झाले. आणि त्यांचें अहिंसात्मक राजकारण स्वाराज्यसंस्थेमधून कसें प्रतिबिंबित होणार आहे ह्याचें दर्शन त्यांच्यामृत्युमुळें होऊं शकलें नाहीं

गांधीजींच्या मतें समाजधारणेचा पाया अहिंसक वृत्ति हाच आहे. आजकालच्या कोणत्याहि सुसंस्कृत–असंस्कृत राज्यसंस्थेचें स्वरूप हिंसात्मकच आहे. राज्यसंस्थेचें रक्षण लष्कराशिवाय, हिंसात्मक सेनेशिवाय, शस्त्रास्त्रांच्या सुसज्जतेशिवाय होऊं शकत नाहीं. लष्कराची आवश्यकता स्वराज्यरक्षणासाठीं अपरिहार्य आहे असें एकदां मान्य केलें म्हणजे संरक्षक स्वरूपाच्या हिंसात्मक वृत्तीची तरी निदान वाढ करणें जरूरीचेंच ठरतें. देशांतील अर्थशास्त्रहि लष्कराच्या ह्या अपरिहार्य आवश्यकतेशीं अननुकूल असून चालावयाचें नाहीं. देशांतील नीतिशास्त्रहि दुष्ट शत्रुत्व करणाऱ्या परकीय राष्ट्रांच्या आक्रमक धोरणाशीं प्रतियोगी व सुसज्ज बनविणें भाग पडतें,

आम्हांस. राजकीय स्वातंत्र्य प्राप्त झालेलें असलें तरी गांधीजींच्याच विचाराची छाप, प्रभुत्व किंवा छाया सध्यांच्या आमच्या राज्यसंस्थेवर आहे. गांधीजींची अहिंसक ध्येयवादी दृष्टि, आणि अहिंसक समाजरचनेचें उद्दिष्ट यांनीं देशांतील महत्त्वाच्या देशाभिमानी कार्यकर्त्यांच्या हृदयाची पकड घेतलेली आहे. ह्या ध्येयदृष्टीची कसोटी लावून आमच्या डळमळीत राज्यसंस्थेनें देशापुढील आर्थिक प्रश्न सोडवयाचे असल्यास तें कार्य अधिकच दुष्कर बनलेलें आहे. आपलें स्वराज्य नवीन आहे. देशांतील परंपरागत अर्थशास्त्र परकीय लोकांनीं स्वार्थबुद्धीनें आणि हिंदुस्थानची सर्वांगीण पिळणूक होईल अशा इराद्यानें बनविलें आहे. देशांतील अर्थशास्त्र परदेशाशीं निगडित झालेलें आहे व परदेशी व्यापारानें तें बांधून टाकलेलें आहे. हे अर्थशास्त्रीय परदेशी बंध गांधीविचारधारेच्या प्रभावानें सैल करण्यावर राज्यसंस्थेचा कटाक्ष आहे असें जरी मानलें तरी सध्यांच्या अर्थशास्त्रीय घालमेलीच्या संकटकालांत देशाचें दीर्घकालीन व शीघ्रकालीन आर्थिक धोरण कसें निश्चित करावें हा प्रश्न आजच्या आमच्या राज्यकर्त्यांच्या हृदयांत फार संभ्रम निर्माण करीत आहे, हें स्पष्ट आहे. सध्यां देशांतील आर्थिक स्थिति अत्यंत आणीबाणीची आहे. जमाखर्चाची तोंडमिळवणी होऊं शकत नाहीं, लोकांच्या आकांक्षा स्वराज्यप्राप्तीमुळें एकदम भरमसाट वाढलेल्या आहेत. लोकांच्या इच्छांना कांहींच ताळतंत्र राहिलेलें नाहीं. ज्यांच्या हातांत प्रत्यक्ष राज्यसंस्थेचीं सूत्रें आहेत तो अधिकारी वर्ग किंवा नोकरशाही देशभक्तीनें प्रेरित झालेली नाहीं. बाजारांतील किंमतींतील अनिश्चिततेमुळें आणि उत्पादनाचा नक्की अंदाज ह्या अवाढव्य देशांत कोणासच नसल्याकारणानें काळाबाजार सर्वत्र वाढीस लागलेला आहे. वैचारिक वातावरण बनविणारा मध्यमवर्ग हवालदिल झालेला आहे. देशांतील सामाजिक नीतिमत्ता दिवसेंदिवस खालावत आहे. आर्थिक बजबजपुरी सर्वत्र वाढलेली आढळून येत आहे.

अशा बिकट परिस्थितींत गांधीवादी म्हणविणाऱ्यांवर व गांधीजींच्या दृष्टीनें रचनात्मक कार्य करणाऱ्यांवर फार मोठी जबाबदारी येऊन पडलेली आहे. तथापि असें कार्य करण्यांतच त्यांच्या ध्येयनिष्ठेची कसोटीहि आहे. गांधीजींना जी अहिंसक समाजरचना अभिप्रेत होती ती सद्यःस्थितींत हळू हळू कां होईना पण निश्चित प्रगतिपर धोरणानें कशी अस्तित्वांत आणतां येईल, हें उद्दिष्ट ठेवून आजच्या राज्यसंस्थेवर अहिंसक दडपण कसें निर्माण करावें, ही समाजरचना अस्तित्वांत आणण्यासाठीं जें अहिंसात्मक आक्रमक सामर्थ्य, नीतिमत्तेचा जो सामाजिक प्रकर्ष आवश्यक आहे त्याची कशी योजना आंखावी, स्वराज्यांतील आजचा अधिकारिवर्ग प्रामाणिक आणि कार्यतत्पर कसा बनवावा, वर्गविरहित शोषणरहित समाजनिर्मितीच्या पायऱ्या कोणत्या, देशांतील सर्व प्रकारच्या मालकी हक्कांस मर्यादा कशा घालाव्या, आर्थिक विकेंद्रीकरण सर्व दिशांनीं कसें अमलांत आणावें, किमान आणि कमाल उत्पन्नांमध्यें किती अंतर असावें, जनतेमध्यें कार्य करण्यास प्रवृत्त करणारी प्रेरकशक्ति कशी आणावी, जमिनीची मालकी, विभाजन व उत्पादन ह्यांसंबंधीं अहिंसक दृष्टीनें कोणतें आयोजन स्वीकारावें, देशांतील नानाविध छोट्यामोठ्या कारखान्यांचें स्वामित्व व्यक्ति, सहकारी संस्था, आणि सरकार ह्यांमध्यें योग्य व शास्त्रीय रीतीनें कसें विभागून द्यावें, बाष्प आणि विद्युत्‌शक्तीवर चालणारे अजस्र कारखाने आणि ग्रामीण उद्योगधंदे ह्यांचें प्रादेशिक विकेंद्रित प्रमाण देशांत कसें अस्तित्वांत आणावें, परदेशी व्यापाराची व्याप्ति किती असावी, आर्थिक परस्परावलंबन व स्वावलंबन ह्यांचें संयोजन कसें करावें, अहिंसक समाजरचना स्थिर करणारें सर्वांगीण शिक्षण कसें द्यावें, असे अनेक प्रश्न गांधीजींच्या अहिंसक, वर्गविरहित व शोषणरहित समाज-स्थापनेची दृष्टि लावून सोडविणें जरूरीचें आहे.

विशेषतः ज्या प्रश्नावर ह्या अहिंसक समाजरचनेचें सारसर्वस्व अवलंबून आहे तो प्रश्न म्हणजे लष्करी सामर्थ्य व तत्प्रीत्यर्थ देशास करावा लाग-





अनुक्रमणिका

## सर्वोदयीन आर्थिक धोरणाची दिशा

णारा अवाढव्य खर्च ह्यासंबंधीं आहे. ह्या लहानशा परिषदेंत श्री. शंकरराव देव ह्यांनींच हा प्रश्न प्रमुखपणानें पुढें मांडून व्यवहार्यतेनें व ध्येयनिष्ठेनें हा प्रश्न सोडविला गेला पाहिजे असें प्रतिपादन केलें. परिषदेचे सभापति आचार्य काकासाहेब कालेलकर ह्यांनीं अर्थपरायण व जीवनपरायण दृष्टींमधील विभिन्नतेचें वैशिष्ट्य दाखवून देऊन, आर्थिक शोषण, गुन्हेगारी व तत्प्रीत्यर्थ शिक्षा, दंड व भय, युद्धसंस्था व भ्रामक उच्चनीचभाव ह्या वर्गवारींत सर्व प्रकारची हिंसा कशी दडलेली आहे आणि ही हिंसात्मक वृत्ति नष्ट केल्याशिवाय देशाचें, समाजाचें व जगाचें स्वास्थ्य कसें अशक्य आहे ह्याचें विवरण केलें. श्री. कुमारप्पा, आचार्य कृपलानी, डॉ. प्रफुल्ल घोष, श्री. गुलझारीलाल नंदा, श्री. किशोरलाल मश्रूवाला, डॉ. सतीश दासगुप्त आदि कार्यकर्त्यांची कळकळ, ध्येयवाद व बुद्धिवैभव प्रभावी असून गांधीमताच्या दृष्टीनें आर्थिक योजनेचा विचार करण्यांत ही सर्व मंडळी अत्यंत समर्थ आहेत. श्री. श्रीकृष्णदास जाजू, श्रीमन् नारायण अग्रवाल, श्री. सत्यनारायण, श्री. ऊव्हे‍भाई, श्री. रामचंद्रन् ह्यांनीं ह्या परिषदेच्या चर्चेत प्रमुखपणानें भाग घेतला. ही आर्थिक योजना बनविणाऱ्या कार्यसमितीचे कार्यवाह अखिल भारतीय काँग्रेस कमिटीचे सुप्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ श्री. मित्र हे आहेत.

ह्या परिषदेसाठीं जे थोडे गांधी–विचाराचे प्रमुख लोक एकत्रित झालेले होते, त्यांचा कटाक्ष नुसत्या बौद्धिक चर्चेवर नाहीं. नुसती बौद्धिक आर्थिक योजना बनवून सद्यःस्थितींत कांहीं उपयोग नाहीं. ती योजना अमलांत कशी आणावयाची ह्याचें तंत्र व साधनें निर्माण करणें हेंच अत्यंत अगत्याचें कार्य आहे हाच ह्या प्रमुख लोकांच्या चर्चेचा एकंदरींत निष्कर्ष आहे.

ही पारिषद् म्हणजे लहानसा आरंभ आहे. ह्या गांधीमताच्या आर्थिक नियोजनाभोंवतीं जर देशांतील सत्प्रवृत्त कार्यकर्त्यांचें देशप्रेमी वर्तुळ जमवितां आलें, तर देशांत जरूर असलेलें नैतिक वातावरण उत्पन्न करणें शक्य होईल. कदाचित् गांधींच्या मृत्यूनंतर देशांत जी नैतिक पोकळी निर्माण झालेली आहे ती अंशतः तरी ह्या कार्यकर्त्यांच्या एकजिनसी नैतिक आचारविचारानें भरून निघण्याचाहि संभव आहे. आणि ह्याच दृष्टीनें वर्ध्यास भरलेल्या ह्या लहानशा आर्थिक परिषदेचें महत्त्व आहे.

---

## महाराष्ट्र-महोदय

'या महाराष्ट्राचें काय होणार ?' या '**मौज**'मधून गाजलेल्या चर्चेचा समारोप 'महाराष्ट्र-महोदय' या शीर्षकाखालीं **श्री. ना. ग. गोरे** यांनीं **दिवाळीच्या (१९४९) 'मौज'**च्या अंकांत केला आहे. त्याचा निष्कर्ष असा आहे : हें युग समाजवादी लोकसत्तेच्या प्रयत्नांचें युग ठरणार आहे.... नफेबाजीवर आधारलेल्या भांडवलशाहीपासून विमुक्त आणि मानवी स्वातंत्र्यें अबाधित ठेवणाऱ्या समाजाच्या दिशेनें मानवसमाजाचा हा गाडा हाकारल्यावांचून तरणोपाय राहिलेला नाहीं. या युगधर्मानुसार महाराष्ट्रांतील कारखानदारी व शेतकी यांचें परस्परसहकार्यांच्या तत्त्वाच्या दिशेनें परिवर्तन होणें जरूर आहे. "महाराष्ट्रांतील कर्तबगार स्त्री-पुरुष मंडळी म्हणजेच नव्या महाराष्ट्राचे शिल्पकार. त्यांच्यांत आर्थिक भेद फारसे तीव्र नाहींत ही एक अत्यंत उपकारक ठरणारी गोष्ट आहे. आतांपर्यंत आम्हीं असंतोषात्मक राजकारणावर व संघटनांवर सर्व लक्ष केंद्रित करीत आलों तो मार्ग दुरुस्त करून आम्हीं जर महाराष्ट्रांतील जनतेंत अधिकांत अधिक सामुदायिक कर्मनिष्ठा आणि विधायक अस्मिता जागवण्यावर भर देण्याचें ठरविलें तर सहकारी उद्योगाचे नानाविध ताटवे फुलवतां येण्यास आम्हांस अडचण पडूं नये.''...... "ब्राह्मण, मराठा व अस्पृश्य या तीन वर्गांतील मध्यमवर्गीय व कनिष्ठवर्गीय तरुण पिढी ज्या दिवशीं आपल्या परंपरागत कोंड्या फोडील आणि आपल्या कर्तृत्वाचे प्रवाह एकत्र मिसळून काम करूं लागेल, त्यावेळीं ही त्रिवेणी महाराष्ट्राच्या भवितव्याचें आनंदवनभुवन बनविल्यावांचून रहाणार नाहीं.''





अनुक्रमणिका

# सा र सं क ल न

## अमेरिकन तत्त्वज्ञ व शिक्षणशास्त्रज्ञ

जगप्रसिद्ध तत्त्वज्ञ आणि शिक्षणशास्त्रज्ञ डॉ. जॉन ड्युई यांचा ९० वा वाढदिवस ता. २० ऑक्टोबरला अमेरिकेंत साजरा झाला. समारंभाच्या वेळीं वेळांत वेळ काढून आपले पंतप्रधान पंडित नेहरू त्यांना भेटले व त्यांनीं त्यांचें अभिनंदन केलें. जॉन ड्यूई आज ९० वर्षांचे झाले असूनहि ते उत्साही तरुणासारखे आहेत. त्यांची जीवनावरील श्रद्धा अढळ आहे. त्यांना दिलेल्या खान्याच्या शेवटीं उत्तरादाखल भाषण करतांना ते म्हणाले :

" भीतीचा त्याग करा. आपण भयग्रस्त असल्यास आपली आपल्या मानवबंधूंबद्दलची श्रद्धा उडून जाते आणि तें तर अक्षम्य पाप होय. माझ्या वर्णनापैकीं एक गोष्ट मी सर्वांत अधिक खरी मानतों. तीं म्हणजे मी मानवाला भयापासून मुक्त होण्यासाठीं साहाय्य केलें आहे.

" सध्यांचा कालच असा आहे कीं माणूस सहजीं श्रद्धा सोडतो. ही श्रद्धा जाणें याचा अर्थ स्वतःबद्दलचा विश्वास जाणें होय व ही गोष्ट सतत लक्षांत बाळगणें हाच एक श्रद्धा वांचवण्याचा सर्वोत्तम उपाय आहे. जर आपण मानवाबद्दलची व मानवी स्वभावाबद्दलची श्रद्धा गमावली तर आपला दृष्टिकोण खरोखर शोकजनकच म्हणावा लागेल." (" न्यू यॉर्क् टाइम्स् ", २१ ऑक्टो.'४९). डॉ. जॉन ड्यूईच्या श्रेष्ठतेविषयी लिहितांना " न्यू यॉर्क् टाइम्स् " ( २० आक्टोबर ) म्हणतो :

"तत्त्वचिंतन हा त्यांचा व्यवसायच बनला होता. वीस वर्षांपूर्वी त्यांनींच म्हटल्याप्रमाणें तो त्यांचा खेळ होता व कामहि होतें. डार्विन, हक्सले व काहीं काळ हेगेल यांच्या विचारांनीं घडविलेली ती सक्रिय निर्मितिक्षम तत्त्वविचारणा होती. आपल्या तत्वज्ञानाचें वर्णन त्यांनीं असें केलें आहे: ' ज्ञान व आचार याबाबत शेवटची अधिकृत गोष्ट अनुभव होय असें मानून त्यावर उभारलेली ती विचारपद्धति आहे '. सर्वसामान्य विचारासंबंधीं ते म्हणतात : ' विशिष्ट सामाजिक अनिष्टांची माहिती व उपाय-पद्धति शोधण्याची तीं रीत असली पाहिजे. ' अशा प्रकारें कल्पनागम्य पूर्णते('अॅब्सोल्यूट')च्या प्रेषितांपासून त्यांनीं फारकत करून घेतली आहे. किंवा असें म्हणतां येईल कीं त्यांचीं संपूर्ण सत्यें हीं अशीं तत्त्वें व रीती होत कीं ज्यांच्या मदतीनें दृश्य जगांतील गोंधळाचें निराकरण करतां यावें. ते आग्रह-पूर्वक असें मानतात कीं मनुष्य हा परिस्थितीचें भक्ष्य नसून आपल्या दैवाचा स्वामी आहे.

"ड्युईच्या शैक्षणिक प्रयोगांत लहान मूल हें केंद्र-स्थानीं होतें. त्या प्रयोगाचा विषय म्हणजे व्यक्तिस्वभाव घडविण्याच्या साधनाचें संशोधन. याचा अर्थ असा नव्हे कीं मुलाला शिस्तीची गरजच नाहीं. त्यांचें शैक्षणिक तत्त्व असें कीं ही शिस्त म्हणजे परिस्थितीची स्वभावसिद्ध प्रतिक्रिया असावी, आणि परंपरेच्या चैतन्यहीन हातानें लादलेली लष्करी कवायत ( regimentation ) नसावी.

" सर्व उदारमतवादी चळवळींत सक्रियतेनें भाग घेऊन डॉ. ड्यूईनीं जन्मभर अप्रतिबंध शोधबुद्धि व सृजनशील चिंतन यांचा मूलभूत मार्गच अवलंबिला. मानवी स्वभाव बदलून आधिक सुधारतां येईल, सर्वोदयाच्या दृष्टीनें आपण आपली परिस्थिती मर्यादित करूं शकतों, अशा प्रकारची त्याची दृढ श्रद्धा म्हणजे त्यांच्यांतील खरा अमेरिकन गुण आहे. आपण सध्यां इतिहासाच्या अशा एका बिंदूशीं येऊन पोंचलों आहोंत कीं अशा वेळीं आपणांला चालू व भविष्यकालीन महान् घडामोडींसाठीं सावध राहिलें पाहिजे. आपणाला त्यासाठीं एकाद्या विशिष्ट श्रद्धेची व






मार्गांची फार आवश्यकता आहे. अशा आणी-बाणीच्या वेळीं आपण जॉन् डयूईव्यतिरिक्त कोणाकडे मार्गदर्शक म्हणून पाहूं शकूं ? जॉन ड्यूई, जे ९० व्या वर्षीहि अमर यौवनाचा उत्साह टिकवून राहिले आहेत ! ''

## विश्वविषयक सिद्धांत आणि मानवी प्रगति

डॉ. आल्बर्ट स्वित्झर या वयोवृद्ध ख्रिस्ती सेवा-वीराचें व संताचें नांव आपल्याकडेहि ओळखीचें होऊं लागलें आहे. आफ्रिकेंतील जंगलांत जाऊन आपल्या पत्नीसह त्यांनीं आदिवासींची सेवा गेलीं पस्तीस वर्षें केली. पण या सेवेकडे वळण्यापूर्वी डॉ. स्वित्झर यांनीं एक उत्कृष्ट चरित्रकार, युरोपांतील पहिले कॉन्सर्ट ऑर्गनिस्ट आणि प्रॉटेस्टंट बायबलचे सर्वश्रेष्ठ अधिकारी तज्ज्ञ म्हणून कीर्ति मिळविली होती आणि उत्कृष्ट शस्त्रक्रियानिष्णात म्हणूनहि ते प्रख्यात झाले होते. अशा विविध क्षेत्रांत उत्कृष्ट यश मिळवून संपन्न बनविलेलें जीवन डॉ. स्वित्झर यांनीं मानवाच्या मानवसेवेला अर्पण केलें आहे. त्यांची मानवाच्या प्रगतीबद्दलची तळमळ केवळ अपूर्व आहे. अशा या जगप्रसिद्ध संत–चिंतकाचे विचार " दि डीके ॲंड रेस्टेरेशन् ऑफ सिव्हिलिझेशन् " या पुस्तकांत नमूद झालेले आहेत. शिवाय त्यांची मुलाखत "रीडर्स डायजेस्ट "च्या वार्ताहरानें घेतली तेव्हांहि त्यांनीं आपले मानवी कर्तव्याबद्दलचे विचार लोकां-पुढें मांडले. ते विचार " मेन करन्टस् इन् मॉडर्न थॉट " च्या 'वसंत-अंका'मधील सारांशावरून व 'रीडर्स डायजेस्ट'च्या ऑक्टोबरच्या अंकांतील मुलाखतीवरून (अनुक्रमें) निवडून घेतले आहेत :

" ... ज्या काळांत आपण राहात आहोंत त्या काळांत विश्वाबद्दलचा तत्त्वसिद्धांत असण्यामुळें उत्पन्न होणारा आशय किंवा अर्थ आढळत नाहीं. सुशिक्षित किंवा अशिक्षित सर्वच लोकांचा असा समज हल्लीं झालेला आहे कीं विश्वाबद्दलचा तात्त्विक सिद्धांत असो वा नसो; मानवजात संतोषकारक प्रगति करीलच करील.

"खरी गोष्ट अशी आहे कीं, सर्व मानवी प्रगति विश्वाविषयींच्या सिद्धांतांतील प्रगतीवरच अवलंबून असते, व या उलट मानवी परागति किंवा अधोगति या विश्वविषयक तत्त्वप्रणालींतील परागतीबरोबरच येत असते. आपण खरी संस्कृतिसुधारणा ( सिव्हिलिझेशन ) गमावून बसलों याचें कारण आपल्याजवळ विश्वविषयक तत्त्वप्रणाली नाहीं हें होय.

" सरळ शब्दांत सांगावयाचें तर बाह्य विश्वाच्या पारिस्थितीनुरूप मानव-जातीला पूर्णतेकडे नेण्याचे व सर्व प्रकारची प्रगति साधावयाचे प्रयत्न करण्यासाठीं आपलें सर्वस्व वाहणें यांतच सुधारणा समाविष्ट आहे. ही मानासिक अवस्था प्राप्त व्हावयासाठीं आधीं दोन गोष्टींची जरूर असते. एक, जगत् व जीवन यांविषयींचें कर्तव्य विधायक वृत्तीनें (affirmatively) करावयास तयारी पाहिजे आणि दुसरें, आपण नीतिमार्गी बनलें पाहिजे....

" जेव्हां प्रगति साधण्याचा दृढनिश्चय स्पष्ट व भक्कम असतो आणि त्याच्या परिणामीं जीवन व जगत् यासाठीं स्वार्पण करण्याची प्रवृत्ति अविचलित असते तेव्हां सुधारणा जन्माला येते. अशा प्रकारच्या ऐहिक आस्तित्वाच्या मर्यादांपलीकडे नेऊन कर्तव्य करावयास लावणारी चैतन्यशक्ति आपणांला नीति-साधनेनेंच मिळूं शकते.

"उत्साह आणि आत्मत्याग यांवाचून जगांतील कोठलीहि खरी महत्त्वाची गोष्ट साध्य झालेली नाहीं.

"निराळ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे, जगत् व जीवनविषयक अस्तिभाव ( affirmation ) हा जगत-व-जीवनविषयक चिंतनाचा परिणाम असला पाहिजे. बहुसंख्य लोक जेव्हां या चिंतनपरिणामाचे अधिकारी होतील व त्याच्या पांखेरखालीं सतत तसेच राहातील तेव्हां खरी व शाश्वत सुधारणा जगांत प्रगत होईल. जर आपली जीवन-जगद्-विषयक अस्तिभावाबद्दलची व नीतितत्त्वाबद्दलची निष्ठा क्षीण होऊं लागेल, किंवा अस्पष्ट व धूसर होऊं लागेल तर आपण खऱ्या सुधारणेसाठीं कार्य करायला नालायक बनत जाऊं; एवढेंच नव्हे तर ही सुधारणा कशा प्रकारची असावी याविषयींची सत्य कल्पनाहि आपणांला करतां येणार नाहीं....

" अशा प्रकारें... शेवटीं मला दोन सत्यें उद्घोषित करायचीं आहेत आणि एक महाप्रश्न





अनुक्रमणिका

पुढें मांडावयाचा आहे : तीं सत्यें हीं कीं, सुधारणा-संस्कृतीला कांहीं मूलभूत नैतिक अधिष्ठान असावें लागतें आणि सुधारणा व विश्वविषयक तत्त्वप्रणाली यांमध्यें अनुबंध, सुसंगति असावी लागते. महाप्रश्न हा कीं नैतिक आणि विधायक अशा दोन्ही स्वरूपाच्या एकाद्या जीवन–व–जगद्‌विषयक तत्त्वप्रणालीला आवश्यक अशी सत्य व शाश्वत बैठक चिंतनांत गवसणें शक्य आहे काय ?

आजचे आपले विचार व श्रद्धा यांमधून निरर्थकता भरलेली जी दिसते ती नष्ट करणें आणि आशा व नवा निश्चय यांनीं युक्त अशी अवस्था पुन्हां प्राप्त करून घेणें यांवरच सुधारणेचा भविष्य-काल अवलंबून आहे. आणि हें साध्य होण्यास आवश्यक गोष्ट ही आहे कीं बुद्धीला पटणाऱ्या व चिंतनावर आधारलेल्या एकाद्या विश्वविषयक तत्त्व-प्रणालिवर जीवन–जगद्–विषयक नैतिक, गंभीर व अविचलित अशी निष्ठा बहुसंख्य व्यक्तींना साध्य झाली पाहिजे.

" अशा तऱ्हेच्या सर्वसामान्य आत्मिक अनु-भूतींवांचून, सर्वनाशाकडे व विफलतेकडे जोरानें धांवणाऱ्या जगाला मागें खेंचण्याचें सामर्थ्य दुसऱ्या कशांतहि नाहीं. म्हणून जीवन व जगत् यांविषयीं फिरून नवी विचारणा सुरू करण्यासाठीं स्वतःला जागृत करणें हें आपलें कर्तव्य आहे.

" चैतन्याच्या या साधनेला मी ' तुमचें दुसरें कर्तव्य ' म्हणतों; यांत केवळ कर्तव्याच्या आनंदा-पेक्षां अन्य लाभ नाहीं. त्यामुळें तुम्हांला अनेक महोदार संधी लाभतील आणि सामर्थ्याची प्राप्ति होईल...सध्यां जगांत जर कसली सर्वांत अधिक कमतरता असेल तर ती इतर लोकांच्या गरजांकडे लक्ष पुरविणाऱ्या लोकसेवकांची होय. या निःस्वार्थ सेवेच्या द्वारा साहाय्य करणारा आणि साहाय्य मिळ-विणारा या दोघांनाही कल्याणाची प्राप्ति होते.

" आत्मिक साहसावांचून रखडणाऱ्या आज-कालच्या स्त्री–पुरुषाला अंधारांतून चांचपडावें लागत आहे. आधुनिक समाजव्यवस्थेच्या दडपणाखालीं आपण आपलें व्यक्तित्व घालवून बसण्याचा संभव आहे. आपली सर्जनाची व आत्माविष्काराची आकांक्षा गुदमरून जात असते; आणि त्या प्रमाणांत खरी संस्कृति–सुधारणा मागें पडत असते.

" याला उपाय काय ? माणूस कितीहि कार्य-मग्न असो, प्रत्येकाला आत्मिक कार्याची हरेक संधि साधून आपलें व्यक्तित्व दाखवून देणें अगदीं शक्य आहे. कसें ?—आपलें दुसरें कर्तव्य बजावून, अगदीं लहान प्रमाणांत कां होईना पण आपल्या मानवबंधूंचें कल्याण साधण्याचा व्यक्तिशः प्रयत्न करून. यासाठीं त्याला फार दूरवर संधि पाहावयाची गरजच पडणार नाहीं....

" आरोग्य, बुद्धिमत्ता, कर्तृत्वशक्ति, यश, सुखाचें बाळपण किंवा घरच्या जीवनांत सुसंवादी परिस्थिति–यांपैकीं तुम्हांला जें प्रमाणाधिक मिळालें असेल, तें स्वाभाविकपणें आपलेंच आहे असें सर्व मानून स्वतःसाठीं राखून ठेवतां कामा नये. आपल्या सुदैवाबद्दल कृतज्ञता व्यक्त करण्यासाठीं तुम्ही आपल्या जीवनांतील कांहीं अंशाचा इतरांच्या जीवनासाठीं त्याग केला पाहिजे....

"संन्यास करणें किंवा त्याग करणें असेल तो आपण आपल्याच सर्वस्वाचा मुख्यतः केला पाहिजे.... लोक असें म्हणतांना मी ऐकतों कीं, 'अहो, मी जर श्रीमंत असतों तर लोकांना किती मदत केली असती ! ' पण आपणां सर्वांना प्रेम व उदारता यांबाबतींत श्रीमंत होतां येईलच. शिवाय आपण जर काळजीपूर्वक हें दिलें, आपली मदत खरी ज्यांना पाहिजे त्यांच्या गरजा ओळखल्या, तर आपण पुरविलेलें प्रेमळ लक्ष किंवा दाखविलेली आपुलकी ही जगांतील सर्व सोन्यारुप्याहून मूल्यवान् ठरतील.

"आणि कोणा विश्वगत नियमाप्रमाणें जसजसें तुम्हीं प्रेम देत जाल तसतसें अधिकाधिक प्रेम व सुख तुम्हांला, देण्यासाठीं, मिळत जातील....

" तुम्हांला वाटत असेल कीं आफ्रिकेंतील विषुववृत्ताखालील जंगलांतील माझें व माझ्या पत्नीचें जीवन मोठें चमत्कारपूर्ण आहे. तेथें आम्हीं केवळ योगायोगानें आहोंत. पण तुम्हीं जेथें आहांत तेथेंच राहून, हजारों लहानलहान गोष्टींत आस्थाची कसोटी पहात, आणि प्रेमाचे विजय संपादन





अनुक्रमणिका

करीत तुम्हांला आपलें जीवन अधिक चमत्कृतिपूर्ण बनवितां येईल. अशा तऱ्हेच्या आत्मिक साधनेला सहनशीलता, भक्ति, धाडस यांची जरूरी असते, इच्छाशक्तीचें सामर्थ्य आणि प्रेमाचा निर्धार यांना त्यांत आवाहन असतें हृचि माणसाची सर्वांत मोठी कसोटी आहे. पण या कठीण 'दुसऱ्या कर्तव्यांतच' खरें सौख्य अनुभवता येतें."

## "उद्यांच्या माणसाची योजना"

प्रसिद्ध ब्रिटिश जीवनशास्त्रज्ञ जे. बी. एस्. हाल्डेन यांनी "जेनेटिक्स्, पॅलीऑन्टॉलॉजी ॲन्ड एव्होल्यूशन्' नांवाचा ग्रंथ लिहिला असून त्यांतील एका प्रकरणाचा सारांश "सायन्स डायजेस्ट्" च्या ऑक्टोबर ४९ च्या अंकांत वरील मथळ्यखाली दिलेला आहे. यापूर्वी भविष्यकालीन मानवाबद्दलचीं स्वप्नें अनेक विचारवंतांनीं जगापुढें मांडलीं आहेतच. त्यांत डॉ. ॲलेक्सिस कॅरेल यांच्या 'मॅन् दि अन्नोन्' या ग्रंथाचें स्थान अपूर्व होतें. केवळ शास्त्रीय दृष्टीनें 'संपूर्ण' मानव लक्षांत घेऊन त्यांनीं संभवनीय भाग दिग्दर्शित केला होता. हाल्डेन हे मार्क्सवादी शास्त्रज्ञ आहेत. तेव्हां ते प्रत्यक्षवादी आहेतच. पण त्यातूनहि उत्क्रान्ति ही मनुष्यकृत परिस्थितीप्रमाणें आपणाला हवी तशी घडवितां येईल--अर्थात् तिचे मूलभूत सिद्धांत मान्य करूनच--हें या पुस्तकांत दाखविलें जाणें अपरिहार्य आहे. आनुवंशिकशास्त्रांतील मेन्डेलवाद हा नैसर्गिक संक्रमण मान्य करतो. रशियांतील शास्त्रज्ञ ही आनुवंशिकता मानवी प्रयोगशाळेंत मर्यादित करतां येईल असें प्रतिपादितात. हाल्डेन यांनीं मार्क्सवाद मान्य केला असला, तरी मेन्डेलवाद अजून सोडल्याचें प्रसिद्ध झालेलें नाहीं. कांहीं असो, त्यांचे पुढील विचार लक्षांत ठेवण्यासारखे खासच आहेत. "सायन्स् डायजेस्ट्" मधील सारांशाचा कांहीं भागच येथें घेतला आहे :

"थोडक्यांत मांडावयाचें म्हणजे असें कीं, गेल्या लाखों वर्षांत मनुष्य अधिकाधिक मेंदूनिष्ठ, अधिक अर्वाचीन ( neoteric ) आणि अधिक व्यक्तिपरत्वें विविधाकारी ( polymorphic ) बनला आहे. मला हें संभवनीय वाटतें कीं, हे उत्क्रांतींतील इष्ट प्रवाह आहेत. परंतु त्यांतील स्थिररूपत्वाबद्दल ( polytypism ) आणि लैंगिक द्विदलतेबद्दल ( dimorphism ) निश्चित मत देणें अजून टाळलें पाहिजे....

"ह्या गोष्टी आपण कशा साध्य करावयाच्या हें मला माहीत नाहीं. कोणत्या मानवी विशिष्ट धर्मांचें सुप्रजनन करावयाचें व कां तें तपशीलवार सांगतां यावयाचें नाहीं.... पशूंची पैदास करणाऱ्यांचे अनुभव या बाबतींत आपल्या फारसे उपयोगीं पडणार नाहींत. याचीं अनेक कारणें आहेत. आपणाला एवढें माहीत आहे कीं, पाळीव जनावरांची अवलाद ही कांहीं अतिशय खास चातुर्याचीं कामें करण्यासाठीं सुधारली आहे... पण कांहीं इष्ट गुण साध्य करण्यासाठीं, कांहीं इतर बाबतींत इष्ट असणारे गुणधर्म त्यांनीं गमावले आहेत. उदा० ग्रेहाउण्डला वासावरून शिकार करतां येत नाहीं, 'डाक्शहुण्ड' ( dachshund ) नांवाचा आंखूडपायी कुत्रा धांवण्याच्या बाबतींत कमकुवत आहे, एस्किमोंचा ( बर्फांतील ) हस्की कुत्रा शहरी जीवनाला लायक नसतो इत्यादि.

"आपणांला कधीं काळीं उत्क्रांतीवर ताबा मिळवावयाचा असेल तर आपणाला आपली गर्भ-स्थापने(mating)ची पद्धति खूपच बदलावी लागेल हें निश्चित. याचा अर्थ असा नव्हे कीं लग्नसंस्था नष्ट करावी लागेल किंवा बहुपत्नीकत्व स्वीकारावें लागेल. जर लोकांना हें पटलें कीं, आपणाला उत्कृष्ट प्रकारची प्रजा उत्पन्न व संवर्धित करावयाची आहे तर जें केवळ अत्यावश्यक असेल तेवढेंच करावें लागेल.

"सध्यां आपणाला कशा तऱ्हेच्या गुणधर्मांची निवड करावयाची आहे तें मला सांगतां येणार नाहीं. कांहीं गोष्टी निर्दिष्ट करावयाच्या झाल्यास असें म्हणतां येईल कीं अत्यंत तीव्र लैंगिक क्रिया स्फुरविणारे, कमी बुद्धिमत्ता दर्शविणारे, किंवा प्रचाराला बळी न पडण्याचा स्वभाव दर्शविणारे प्रजनक जीवाणू ( genes ) आणि पसंत करूं.

"बहुतेक सुप्रजाशास्त्रज्ञांचें असें मत आहे कीं, मोठ्या कुटुंबांतील मातापिता सुप्रजाजननाच्या दृष्टीनें एकंदरीत इष्ट नसतात, हें खरें असेलहि.

एवढें मात्र निश्चित कीं, एकंदरींत ते आर्थिक दृष्टीनें अपयशी असतात.

" मला असें नक्की पटलें आहे कीं, उत्क्रांतीवर ताबा चालविण्यासाठीं अवश्य असलेलें ज्ञान हें आजची संस्कृति ज्यावर उभारली आहे त्या साग्र वैज्ञानिक ज्ञानापेक्षां फार व्यापक प्रमाणावरचें असावें लागेल. जर आपणाला तें अवश्य वाटत असेल तर तें आपण खात्रीनें साध्य करूं शकूं, एवढें नक्की.

" आपलें त्वरित करावयाचें कार्य म्हणजे मानवी समाजाची नवी घडी बसविणें हें आहे. तें कांहीं पिढ्यांतच साध्य होण्यासारखें आहे. कोणताहि समाज पूर्ण नसतो आणि सामाजिक बदल घडवावयास लागणारा कालखंड उत्क्रांतिजन्य बदल व्हावयास लागणाऱ्या कालाच्या मानानें इतका कमी आहे कीं, उत्क्रांतीवर ताबा मिळवण्यापेक्षांहि समाजव्यवस्था सुधारण्याचें कार्य अधिक त्वरित करावें लागणार आहे.

" हीं दोन्हीं कर्तव्यें बरोबरच झालीं पाहिजेत व होतीलहि; परंतु भविष्यकालीन मनुष्य हा चालू काळांतील अमेरिकन, ब्रिटिश, रशियन किंवा चिनी समाजांत किंवा आपल्या कल्पनेंतील एखाद्या समाजांत सुयोग्य ठरेल अशी कल्पना करणें मात्र घातक ठरेल...मला जर बरोबर सांगतां येत असेल तर तो (भविष्यकालीन मानव) कदाचित् शारीरिक मानसिक आणि नैतिक दृष्टींनीं सदोष मानला जाईल. पूर्ण वाढ झालेल्या अशा त्या माणसाचें स्नायुचापल्य खूप असेल पण स्नायुसामर्थ्य कमी असेल; त्याचें डोकें मोठें असेल, दांत कमी असतील इत्यादि......त्याची वाढ कदाचित् फार हळू होईल. बोलायला पांच वर्षांपर्यंत तो शिकणार नाहीं, पण चाळीस वर्षांच्या पक्व वयापर्यंत पुढें शिकत राहील, आणि मग अनेक शतकें जगेल......

" तो आपल्या मानानें अधिक बुद्धिनिष्ठ आणि कमी प्रेरणाधीन असेल, लैंगिक व पितृत्वाच्या (Parental) भावनांच्या कमी आहारीं जाईल किंवा एका बाजूला क्रोध व दुसऱ्या बाजूला तथाकथित समूहवृत्ति यांना कमी बळी पडेल.... त्याची चालनाशक्ति आपल्या मानानें फार मोठ्या प्रमाणांत शिक्षणावर अवलंबून असेल. तो त्याच्या स्वतःच्या समाजांत सज्जन नागरिक ठरेल, पण आपल्या समाजांत कदाचित् गुन्हेगार किंवा भ्रमिष्ट मानला जाईल. आपल्या मानानें त्याची बुद्धिमत्ता वरच्या पातळीची असेल आणि त्या (उत्क्रांत) समाजांतील बहुतेक व्यक्तींना अशी एखादी बाजू साध्य झालेली असेल कीं जिला आपण प्रतिभा (genius)च मानूं. मानवपूर्ण सस्तन प्राण्यांचे (Sinanthropus)चे अवशेष चीनमध्यें सांपडले आहेत. आपण जर त्या (प्राण्यांच्या) भूतकाळांत उचलून ठेवले गेलों तर जसे त्या काळच्या 'सायनाथ्रोपुस' कडून धन्यवाद मिळवूं शकणार नाहीं, तद्वत् या योजनाबद्ध उत्क्रान्तीची एकादी निर्मिति (व्यक्ति) आपल्या काळांत आणली जाईल तर ती व्यक्ति आपणाला कदाचित् असंतोषकारक वाटेल. पण या विचारानें आपण अस्वस्थ होण्याचें कारण नाहीं. अशी व्यक्ति आपणांला (तरी) भेटणारहि नाहीं."

## प्रो. बर्नाल आणि रशियांतील "शांतताप्रेम"

इंग्लंडांतील बर्कबेक् कॉलेजचे प्रोफेसर बर्नाल मॉस्कोला गेल्यावर त्यांना तेथें युद्धाची तयारी न दिसतां शांततेचें प्रेम व गरज दिसली. युद्धाची भूमिका पाश्चिमेची राष्ट्रेंच उठवीत आहेत असें त्यांनीं आपलें मत व्यक्त केलें व स्तालिन हा महान् नेता व विज्ञानाचा संरक्षणकर्ता आहे असें त्यांनीं म्हटलें. त्यामुळें इंग्लंडातील वृत्तपत्रांनीं त्यावर टीका केली व म्हटलें "बर्नाल असे स्तुतिपाठक असतील असें माहीत नव्हतें...त्यांना मॉस्कोंतील जनतेला कांहीं सत्य गोष्टीहि सुनवतां आल्या असत्या..." ('क्रिटिक,' " न्यू स्टेट्समन अँड नेशन्", सप्टें. ३ व २४). त्यावर प्रो. बर्नाल यांनीं त्याच वृत्तपत्राच्या सप्टें. २४ च्या अंकात एक विचारप्रवर्तक पत्र लिहून राशियांतील शांतताप्रेम व शांतिस्थापनेची आवश्यकता यावरचे आपले स्वानुभवाचे विचार मांडले आहेत:

"सोव्हिअेत् राष्ट्रसमूहाला शांततेची गरज कां आहे हें समजायला आपण मार्क्सवादी असलोंच पाहिजे असें नाहीं. त्यांनीं अत्यंत त्वरित गतीनें स्वरूपतःच शांततामय असणारी संस्कृति

रचावयाचा भगीरथ प्रयत्न चालविला आहे. घर-बांधणी, शेती, उपजीविकेचे धंदे हीं आतां त्यांना शक्य झालीं आहेत; कारण त्यांनीं मोठ्या पायावर उद्योगधंदे सुरू केले आहेत.

" सोव्हियेत संघाबद्दलची पहिली मनावर परिणामकारक गोष्ट ही आहे कीं, तें राष्ट्र उद्योगधंद्यांचें उत्पादक आणि स्वावलंबी केन्द्र बनलें आहे. आपण मात्र तसें राहिलों नाहीं. याबद्दल आपल्या अमेरिकेवरील अवलंबनाचेंच आपण आभार मानले पाहिजेत! सोव्हिएतला बनवितां किंवा करतां येत नाहीं अशी एकहि गोष्ट नाहीं. बांधणीकामांत ते जगाच्या फार पुढें आहेत.... तेवढीच महत्त्वाची आणि या बाह्यनिष्ठ गोष्टींशी जुळणारी अशी गोष्ट म्हणजे तेथें आतां निर्माण होत असलेली नवीन पद्धतीची संस्कृति होय. तिचा मुख्य विशेष हा आहे कीं, ती सर्व जनतेची संस्कृति आहे; केवळ ' उच्चभ्रू ' मध्यमवर्गाची नव्हे. ' शांतता-कॉंग्रेस 'मध्यें तुम्हांला शेतकरी, ट्रेड-युनिअनिस्ट, कलावंत व शास्त्रज्ञ मंडळी आढळून येतीत. ती प्रत्यक्षवादी व आशावादी संस्कृति आहे. ती मार्क्स-वादी असल्यामुळें जगांतील संस्कृतींतलि शाश्वत तत्त्वें तिनें उचललीं आहेतच आणि त्याबरोबरच सोव्हियेत जनतेच्या इतिहासांतील भूमींत तिचीं मुळें खोलवर रुजलीं आहेत

" आतां या नवीन संस्कृति–सुधारणेच्या अवधींत युद्ध आलेंच तर तें केवळ निरुपायानें स्वीकारलेलें संकट म्हणूनच येऊं शकेल; कारण अगोदरच युद्धानें फार मोठा बळी घेतलेला आहे. वैयक्तिक हानीच्या स्मृतींनें पुनर्रचनेचें कार्य अभ्राच्छादित होत असतें. तेव्हां आपल्या सत्तर लक्ष उत्कृष्ट संतानांचा नाश झाल्यावरहि सोव्हियेत संघ पुनरुज्जीवित होत आहे हीच खरोखर चमत्काराची गोष्ट आहे. त्यांपैकीं कोणालाहि, शासकांपैकीं कोणालाहि, ती आपत्ति पुन्हा ओढवून घेण्याचें सुचणारच नाहीं. युद्धाची छाया हीच त्यांची एकमेव भीति आहे आणि त्याचा प्रतिबंध करणें ही त्यांची मनापासूनची इच्छा आहे.

" भांडवलदारी जगांत शांततेची कांहीं कमी आवश्यकता नाहीं; पण आपली स्थिति अगदीं वेगळी आहे. आपले उद्योगधंदे आर्थिक अशक्यतेच्या जाळ्यांत अधिकाधिक गुंतले जात आहेत; आपली संस्कृति निराशेच्या मोठ्या वावटळींत सांपडली आहे. पश्चिमेकडील उद्योगप्रधान राष्ट्रांतील जनतेला व त्याहून अधिक संख्येच्या मागसलेल्या शोषित विभागांतील लोकांना पुन्हा पुन्हा दुर्दैवाचें रहाटगाडगें फिरवणारी शासनपद्धति टिकवून धरणें कमीकमी अगत्याचें वाटूं लागलें आहे. आणि ...संपूर्ण उत्पादन व नफा यांचें एकमेव साधन युद्ध हेंच असल्यामुळें उद्योगधंद्याच्या शासकांनाच त्याची गरज असते.... सरते शेवटीं युद्धांत गुंतलें न जाण्याचा जनतेचा निर्धार पैशाच्या सामर्थ्यापुढें टिकतो कीं नाहीं यावरच ' युद्ध कीं शांतता ' ह्या प्रश्नाचा निकाल अवलंबून आहे. शांतता-चळवळीचें खास महत्त्व आज या बाबतींतच आहे.

"... गौण गोष्टींकडे लक्ष वेधून मुख्य महत्त्वाची गोष्ट नजरेबाहेर करावयाची, या तंत्रामुळें उदारमतवादीहि प्रतिगामी प्रवृत्तींचा विरोध करणें टाळीत असतो. मला माहीत आहे कीं, बरेच वेळां हा दुबळेपणा क्षणिक असतो; मुख्य बाबी पूर्णपणें नजरेसमोर आल्या म्हणजे खरा उदारमतवादी जनतेलाच पाठिंबा देत असतो. पण एकंदर स्थिति तोलून पाहावयाला वेळ उरलेला नाहीं; शांततेच्या रक्षणार्थ सर्वांनीं प्रयत्न करणें खरोखर या क्षणीं जरूरीचें आहे, अनिश्चित भविष्यकाळीं नव्हे."

## आसाममधील आदिवासी

श्री. नलिनिकुमार भद्र यांनीं " मॉडर्न् रिव्ह्यू " च्या ऑक्टोबरच्या अंकांत आसाममधलि आदिवासी जातींबद्दलचे आपले अनुभव निवेदन केले आहेत. भारताच्या पूर्वेकडील ईशान्य कोपऱ्यांतील पहाडी मुलुखांतील जंगली जाती मोठ्या बालिष्ठ आहेत. तेथें त्यांचीं राज्यें आहेत. त्यांना बरोबर कह्यांत ठेवून सुरळीत कारभार चालवणें मोठें हुशारीचें काम समजलें जातें. त्यापैकीं खाशी पर्वतामधील दोन जातींशीं लेखकाचा जो संबंध आला व त्यानें त्यांचे जे रीतिरिवाज पाहिले ते शक्य तों त्याच्याच शब्दांत (संक्षेपानें) पुढें दिले आहेत:

" चेरापुन्जीच्या रस्त्यावर असतां आम्हीं माम्लु नांवाच्या खेडयापाशीं आलों. तेथें योगा-योगानें त्याच वेळीं तिरंदाजीच्या चढाओढी चाललेल्या आम्हाला पहावयास मिळाल्या. खाशींतलि दोन स्पर्धाळू खेडेगांवातील त्या चढाओढी होत्या. एका मागून एक तिरंदाज दूरचा नेम साधीत असतो. यशस्वी उमेदवाराचें जमलेले लोक टाळ्या वाजवून अभिनंदन करतात. विजयी झालेल्या खेडेगांवचे लोक गात व नाचत परत जातात. गांवातील तरुण मुली त्यांचें स्वागत करतात व त्या चढाओढीचीं वर्णनें मन लावून ऐकतात. तिरंदाजी हा खाशी लोकांचा राष्ट्रीय खेळ आहे.

" चेरापुंजीहून शिलांगला आल्याबरोबर कळलें कीं, जवळच स्मिट नांवाच्या ठिकाणीं खाशीचा ' नोंग क्रेम ' नांवाचा समारंभ व्हावयाचा आहे व त्यांत खाशी मुलींचा नाच हा महत्त्वाचा भाग असतो ...राजाची उपाध्याया जेथें राहात असे त्याच्या समोरच्या मोठया आंगणांत आम्हीं आलों ! आवार बांबूच्या कुंपणानें वेढलेलें होतें. खूप गर्दी जमली होती. एका बाजूला पुरुष व दुसऱ्या बाजूला स्त्रिया बसल्या होत्या. आंगणाच्या मध्यभागीं पन्नास तरुण मुली नाचाच्या तयारीनें रांगारांगांनीं उभ्या होत्या. सर्व दिसायला चांगल्या होत्या व कांहीं तर सुंदरहि होत्या. सर्वांच्या अंगावर रेशमी साड्या होत्या व रंगीबेरंगी जाकिटें होतीं. गळ्यांत सोन्याच्या व पोंवळयांच्या माळा होत्या. सोन्या-रुप्याच्या लांब सांखळ्या त्यांच्या छातीवर रुळत होत्या व कानांत सोन्याचे डूल असून हातांत रुप्याच्या बांगड्या होत्या. प्रत्येक नाचणाऱ्या मुलीच्या डोक्यावर सोन्याचा किंवा रुप्याचा मुगुट चमकत होता. केसांचा शेपटा पाठीवर लोंबत होता. नाच म्हणजे अगदी संथ हालचाली व हावभाव करीत पुढेंपुढें सरकणें. या मुलींत कांहीं राजघराण्यांतलि मुली होत्या. त्यांच्यावर कांहीं परिचारिकांनीं छत्र्या धरल्या होत्या. बाजूला ढोल वाजत होते व नाचाला ताल देत होते.

" एका तासानें खाशी पुरुष लढवय्याच्या वेषांत त्या जागीं आले. पागोटीं काळ्यापांढ्र्या कोंबडयांच्या पिसांनीं सुशोभित केलेलीं, पाठीवर बाण आणि कोंबडयांचीं पिसें, हातांत ढाल-तलवारी. त्यांचा नाच सुरू झाला व शेवटीं ते जोडीजोडीनें लुटूपुटीचीं द्वंद्वें करूं लागले.

" दोन्ही नाच अगदीं कंटाळवाणे वाटले. मुलींच्या हावभावांत किंवा पवित्र्यांत कांहीं बदलच होत नसे.

" ' नोंग क्रेम पूजे 'तील दुसरा विधि म्हणजे ' पाम-ब्लांग ' किंवा बोकड मारण्याचा विधि होय. हा विधि खाशी राजा सिल्म याच्या खास देख-रेखीखाली होतो. ' का ब्लेई संन्सार ' ( समृद्धीच्या देवी ) ला संतुष्ट करायला हा बळी देतात. कारण राज्याची आबादी तिच्या कृपादृष्टीवर अवलंबून असते.

"जैंतिया डोंगरांतील लोकांना सीन्टेंग म्हणतात. तेहि खाशी लोकांप्रमाणेंच मंगोलियन वंशांतील आहेत. 'बेह् डिंगेग ख्लांम' नांवाचा या लोकांचा सर्वश्रेष्ठ वार्षिक समारंभ आहे. तो जूनमध्यें साजरा होतो. याचा अर्थ 'इडापिडा काठ्यांनीं मारून घालविणें' असा आहे. 'का-इंग-पूजा' नांवानें कांहीं घरें दूर ठेवलेलीं असतात. तेथें हा समारंभ होतो. बांबूचे खेळांतले रथ तयार करतात, रंगीत कागद मढवतात, सायंकाळीं उघड्या मैदानावर कागदाचीं विमानें उडवतात. सकाळीं मुख्य मंडपांत लहान-मोठ्यांच्या नाचाचा समारंभ होतो. सायंकाळींहि पुरुष नाचतात व स्त्रिया नटूनथटून येऊन प्रेक्षकांचें काम करीत असतात. पुरुष जंगलांतलि कळकाच्या काठ्या तोडून आणून आपल्या घराचें छप्पर बडवीत असतात. कारण त्यामुळें इडापीडा टळते असा त्यांचा समज आहे.

"हा नाच चालतो तेव्हां कांहीं माणसें जंगलांतून उंच खांब तोडून त्या ठिकाणीं आणतात. हा खांब म्हणजे 'यू ब्लेई' किंवा 'जगत्कर्ता परमेश्वर' यांचें प्रतीक आहे असें ते समजतात. ओढ्यावर तो आरपार टाकल्यावर जमलेले लोक त्यावर चढतात. तो जिंकायच्या चढाओढी लागतात. विजयी पक्षाला आरोग्य व सौख्य लाभते अशी त्यांची समजूत आहे.

" अंत्य संस्कारहि असाच चमत्कारपूर्ण असतो. प्रेतावर वेताची चटई घालतात व तें तिरडीवर ठेवून चार खांद्यांवर स्मशानांत आणतात. मीं पाहिलेल्या स्मशानयात्रेंत पुरुष व स्त्रिया दोन्ही असून त्यांच्या हातात सुपाऱ्या, शिजविलेला भात, आमटी, व तांदुळाची दारू वगैरे होतें. चितेवर प्रेत ठेवल्यावर लोकांनीं सुपाऱ्या व चांदीचीं नाणीं त्यावर टाकलीं. शवाला अग्नि देतांच मृताच्या मामांपैकीं एकानें एक कोंबडें कापलें आणि रक्ताचे थेंब अग्नींत शिंपले. कोंबडें मग भाजलें व त्याचे भाग करण्यांत आले. एका म्हाताऱ्यानें त्या तुकड्यांत बांबूच्या काड्या बोंचून ते कोंपऱ्यांत ठेवून दिले. प्रेत जळल्यावर अस्थी व चांदीचीं नाणीं गोळा करण्यांत आलीं. त्यावर सुपाऱ्या व खायचीं पानें ठेवलीं व एका म्हातारीनें कांहीं मंत्र म्हटले. जवळच एक चबुतरा केलेला होता. त्यावर केळीं, संत्रीं, भाकऱ्या व इतर खाद्य पदार्थ ठेवले होते. म्हाताऱ्या बाईनें—ती इह—व—परलोकांतील मध्यस्थ होती— मंत्र म्हणून जमिनीवर बरीच दारू शिंपडली. मामानें तीं हाडें एका रुंद दगडाखालीं ठेवलीं. तेथून तीं मग स्मारकाच्या ठिकाणीं नेऊन ठेवावयाचीं. हे ' का-जिंग-कीन्-माव् ' नांवानें ओळखले जाणारे दगड जोबाई गांवीं ठिकठिकाणीं आढळतात.

"या खाशी व जैंतिया ( सींन्टेंग ) लोकांचें अन्नामच्या मोन जातीशीं व कांम्बोडियाच्या ख्मेर जमातीशीं सांस्कृतिक साधर्म्य आहे. म्हणून वंशशास्त्रज्ञ असें मानतात कीं ह्या दोन्ही जमाती इन्डोचीनच्या मोन-ख्मेर जमातींतीलच होत. त्यांचें मुन्डा जमातींशीं ( म्हणजे सन्ताल, मुन्डा व कार्फू जमातींशीं ) भाषिक साम्य आहे. परंतु त्यांच्या शरीररचनेंत फरक आहे; म्हणून खाशी हे दिसायला मंगोलियन वंशांतील आहेत, पण त्यांचा भाषिक संबंध मात्र ऑस्ट्रिकभाषीय कोलारियन वंशाशीं आहे.

" समाज मातृसत्ताक आहे. सर्वांत धाकट्या मुलीला मोटा वांटा मिळतो. इतर बहिणींनाहि वांटा मिळतोच. लग्न झाल्यावर मुली नवऱ्याकडे जात नाहींत, माहेरींच ( अगदीं शब्दार्थानें ' मातृ-गृहीं 'च ) राहतात. रात्रीं नवरा घरीं येतो व फक्त रात्रींच त्याची भेट होऊं शकते. मात्र येथें त्याला कांहीं खाणेंपिणें करतां येत नाहीं. दिवस उगवायच्या आंत त्याला तेथून परतावें लागतें. मुलांना वारसा नसतो. सीन्टेंगमध्यें ही मातृसत्ताक समाजपद्धति विशेष प्रचारांत आहे.

" १६ व्या शतकांत जैंतियापुरच्या सीन्टेंग राजांनीं हिंदुधर्म स्वीकारला. ते शाक्तपंथी होते. हळूहळू बरेच सींटेंग लोकही हिंदु बनले व आसाममधील इतर जनतेचा दर्जा त्यांना प्राप्त झाला... त्यांच्या व आपल्यामधील पूर्वीचा हा सांधणारा दुवा आज निखळला आहे. भारताच्या कल्याणाची काळजी वाहणाऱ्या सर्वांनीं तो पुन्हा सांधण्याचा जोराचा प्रयत्न केला पाहिजे. कारण देशहिताच्या दृष्टीनें तें फारच अगत्याचें आहे. "

### "काला आदमी"चें रामायण

अमेरिकेंतील शहरें, मजूरवस्ती, खेडेगांवें व मोठीं शहरें मिळून सुमारें १ कोटी ४० लक्ष काळे नीग्रो तेथें आहेत. नुकतीच त्यांनीं प्रेसिडेंट ट्रुमन-समोर निदर्शनें केल्याचें आपण वाचलेंच आहे. जगांतील प्रमुख लोकशाही राष्ट्र अमेरिका आहे. पण तेथेंहि या ' काळ्या आदमीं ' (Blackies)ना तिरस्कारानें वागविलें जातें. नीग्रोंच्या या अनेक शतकें चाललेल्या पद्धतशीर छळाचें ' रामायण ' ( ' ओडीसी ' ) " ब्लॅक ओडीसी " नांवानें मि. रॉय् ओट्ली यांनीं लिहिलें असून तें जॉन् मरे यांनीं प्रसिद्ध केलें आहे. सुरुवातीलाच लेखक हें स्पष्ट नमूद करतो कीं,

" या राष्ट्राच्या उभारणीसाठीं नीग्रोंनीं कितीहि रक्त, घाम व अश्रु गाळले असले तरीहि तो या राष्ट्रांत ( अमेरिकेंत ) अजून अस्पृश्यच आहे. तात्त्विक दृष्टीनें तो कोणाच्याहि बरोबरीचा आहे. पण गोऱ्या जगांत असें गुप्त संगनमत आहे कीं, त्यामुळें त्याची स्थिति दुय्यम दर्जाच्या नागरिकांसारखी आहे.

" दारोदार भटकणारा तो अतिशूद्र आहे, दक्षिण भागांत त्याला शाळेंत, नाट्यगृहांत, रेस्टॉरंटमध्यें, हॉटेलांत, पुस्तकालयांत, वस्तु-संग्रहालयांत प्रवेश मिळत नाहीं; एवढेंच नव्हे तर





अनुक्रमणिका

निवडणुकींच्या मतदानाच्या जागेवरहि त्याला प्रवेश नाहीं.

"उत्तर विभागांत त्याला वरिष्ठ दर्जाच्या वसतींत मज्जाव असतो. कांहीं मर्यादित शाळांत प्रवेश मिळतो, आणि पुष्कळशा सार्वजनिक मनोरंजनाच्या स्थळीं त्याला वगळण्यांत येतें, उत्तर व दक्षिण विभागांतील फरक फक्त अंशाचाच आहे. वांशिक तरतमभावाची अंमलबजावणा तेथें कमी जाचक व कमी रांगडेपणाची आहे एवढेंच."

या 'रामायणांत' सतराव्या शतकापासूनचा गुलामगिरीविरोधी चळवळींचा इतिहास आहे व त्यांत आरंभीं गुलामांचा अनन्वित छळ कसा होत होता याचें वर्णन आहे. त्यांत नॅट् टर्नर या 'काळ्या पैगंबरा'ची कहाणी असून त्याला शेवटीं कसें झाडाला टांगून मारण्यांत आलें व त्याच्या कातडीपासून चरबी कशी बनविली गेली याचें मोठें शहारे आणणारें वर्णन आहे. गुलामगिरीच्या कायदेशीर उच्चाटनापर्यंत तो इतिहास वर्णिलेला आहे.

## ईस्ट आफ्रिकेंतील वर्णद्वेष

यावरून मार्चच्या "मॉडर्न रिव्ह्यू" मध्यें आलेल्या एका लेखाची आठवण होते. मि. एम्. जे. सेरोनी (Seroney) यांनीं आपले अनुभव त्यांत मांडले आहेत :

"मला नेहमीं विचारण्यांत येतें कीं पूर्व आफ्रिकेंत जातिभेद आहेत कीं नाहींत? माझें उत्तर 'होय' असेंच आहे... यूरोपियनांचा उच्चवर्ण-ब्राह्मणवर्ग, हिंदी लोकांचा त्यानंतरचा आणि आफ्रिकनांचा शेवटचा वर्ग. सर्वांत अधिक वर्णद्वेष जर कुठें अंमलांत असेल तर तो 'किपान्डे' (the Kipande) म्हणजे 'नेटिव्ह रजिस्ट्रेशन सर्टिफिकेट' बाबत होय...कायद्यानें 'नेटिव्ह' ला हें सर्टिफिकेट जवळ बाळगावें लागतें. पाहायला मागितल्यावर जर त्याला हें 'किपान्डे' दाखवितां आलें नाहीं तर तो 'नेटिव्ह रजिस्ट्रेशन' वटहुकुमान्वयें (१९२१) फौजदारी गुन्हेगार होतो......

"एका वर्षापूर्वीपर्यंत तरी नैरोबीमध्यें आफ्रिकनांना सिनेमागृहांत जायचें असलें तरी स्पेशल पास लागत...आणि इतकेंहि करून त्यांच्यासाठीं पुढची (जेथून सिनेमा चांगला दिसत नाहीं ती) जागा त्यांच्यासाठीं 'राखलेली' असे.

"नैरोबी व इतर ठिकाणचीं पुष्कळ हॉटेलें बिनयुरोपियनांना मोकळीं नसतात. अर्थात् आफ्रिकन वाढपी तेथें असतील.पण त्यांना कोणी तेथें वाढणार नाहीं.

"आफ्रिकनांना यूरोपियन किंवा हिंदी लोकांच्या डब्यांतून प्रवास करतां येणार नाहीं. वेटिंग रूम्स् वर्गांनुसार नसतात, तर वर्णाप्रमाणें असतात !... युरोपियन पहिल्या वर्गाचे प्रवासी मानले जातात, आशियाई दुसऱ्या वर्गाचे प्रवासी व हे 'नेटिव्ह' लोक तिसऱ्या वर्गाचे. वेटिंग रूम्स् याप्रमाणें नक्की केलेल्या असतात आणि पहिल्या वर्गानें प्रवास करणाऱ्या आफ्रिकन प्रवाश्याला तिसऱ्या वर्गाच्या वेटिंग रूममध्यें राहावें लागतें व तेथील भयानक प्रकार सहन करावे लागतात."

या वर्णविद्वेषाच्या चित्रांत युरोपियनांबरोबरच आशियाई–हिंदी लोकांचा दोषहि चित्रित झालेला आढळतो. ह्या प्रकारावरून आपल्यालाहि आत्म-निरीक्षणाची जरूर किती आहे तें सहज स्पष्ट होतें.

---

